# नवभारत

वर्ष ८ वें ] नोव्हेंबर १९५४ [ अंक २ रा



वार्षिक वर्गणी ९ रु. ] [ किरकोळ अंक १ रु.




नोंदणी क्रं. एफ.१६०९४(मुंबई)







महाराष्ट्र शासन
मराठी भाषा विभाग
**राज्य मराठी विकास संस्था**
**एल्फिन्स्टन तांत्रिक विद्यालय, ३, महापालिका मार्ग,**
**धोबीतलाव, मुंबई – ४००००१ दूरध्वनी : (०२२) २२६३१३२५ / २२६५३९६६**
संकेतस्थळ https://rmvs.marathi.gov.in इ-पत्ता rmvs_mumbai@yahoo.com

# निवेदन

राज्य मराठी विकास संस्था, मुंबई ही महाराष्ट्र शासनाने स्थापन केलेली स्वायत्त संस्था आहे. मराठी भाषा विभागाच्या पत्राप्रमाणे (संदर्भ क्र. मसंस २०१६/प्र.क्र.११५/२०१६/भाषा-२, दि. ३ जानेवारी, २०१७) राज्य मराठी विकास संस्थेद्वारे '**महाराष्ट्रातील मराठी संशोधन मंडळ/ संस्थांना अर्थसाहाय्य योजना**' कार्यान्वित करण्यात आली असून या योजनेअंतर्गत महाराष्ट्रातील मराठी भाषा, साहित्य व संस्कृती वृद्धिंगत होण्यासाठी काम करणाऱ्या महाराष्ट्रातील मान्यताप्राप्त मंडळ/ संस्थांना अर्थसाहाय्य करण्यात येते.

सदर प्रकल्पांतर्गत प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांना राज्य मराठी विकास संस्थेद्वारे नवभारत मासिकांचे ऑक्टोबर १९४७ ते सप्टेंबर २०१७ पर्यंतच्या अंकांचे संगणकीकरण करून ते सार्वजनिकरीत्या आणि विनामूल्य उपलब्ध करून देण्यासाठी अर्थसाहाय्य करण्यात आले होते. याअंतर्गत सदर अंकांचे संगणकीकरण करण्यात आले असून **प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांनी हे अंक जतन केलेले असल्यामुळेच आपल्याला संगणकीय स्वरूपात उपलब्ध होत आहेत.**

या अंकांच्या पीडीएफ प्रती आपण विनामूल्य उतरवून घेऊ शकता. असे करताना खालील सूचना लक्षात घेऊन त्यांचे पालन करावे.

१. सदर ग्रंथांच्या पीडीएफ प्रती या वैयक्तिक वापरासाठी विनामूल्य उतरवून घेता येतील तसेच इतरांनाही विनामूल्य देता येतील. पण कोणत्याही कारणासाठी त्याचा व्यावसायिक वापर करता येणार नाही.
२. सदर ग्रंथांचे दुवे इतरांना देताना त्यासाठी कोणतीही रक्कम आकारता येणार नाही.
३. पीडीएफ प्रतींवर असलेली राज्य मराठी विकास संस्था, मुंबई व प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांची मुद्रा आपणास काढता येणार नाही.
४. आपल्या अभ्यासासाठी, संशोधनासाठी या सामग्रीचा उपयोग करताना आपण योग्य तो श्रेयनिर्देश केला पाहिजे.

वरील अटींचा भंग झालेला आढळल्यास कायदेशीर कारवाई करण्यात येईल.

**स्पष्टीकरण : सदर सामग्री ही केवळ ऐतिहासिक दस्तऐवज म्हणून उपलब्ध करण्यात आली असून या सामग्रीतून व्यक्त होणारी मते, विचारसरणी इ. त्या त्या लेखक, संपादक इ. कर्त्यांची आहे. त्यांपैकी कोणतेही मत, विचारसरणी इ. यांचा पुरस्कार महाराष्ट्र शासन, मराठी भाषा विभाग, राज्य मराठी विकास संस्था व प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांपैकी कुणीही करत नसून त्या त्या मताचे वा विचारसरणीचे दायित्व उपरोक्त विभागांवर असणार नाही.**

अनुक्रमणिका






सुलभ राष्ट्रीय ग्रंथमालेच्या विश्वस्तमंडळाचें मासिक

वर्ष आठवें | अंक दुसरा

# नवभारत

नोव्हेंबर १९५४

संचालक : श्री. शंकरराव देव

संपादक-मंडळ

आचार्य शं. द. जावडेकर–आचार्य स. ज. भागवत–श्री. हरि कृष्ण मोहनी–प्रा. गोवर्धन पारीख

प्रा. वि. म. बेडेकर का. संपादक



वार्षिक रु. ९ सहामाही रु. ५ अंकास रु. १

हें मासिक श्री. म. शं. साठे यांनीं दी प्राज्ञ प्रेस, ३१५ गंगापुरी, वाई येथें छापून प्रा. वि. म. बेडेकर यांनीं सुलभ राष्ट्रीय ग्रंथमालेच्या विश्वस्तमंडळाकरितां तेथेंच प्रसिद्ध केलें.

पत्रव्यवहाराचा पत्ता : १ संपादकीय : कार्यकारी संपादक, ‘नवभारत’ मासिक, ९०६ शिवाजी नगर, पुणें ४

२ व्यवस्थापकीय : व्यवस्थापक, ‘ नवभारत ’ मासिक, C/o प्राज्ञ प्रेस वाई ( जि. सातारा )

# 'नवभारत' मासिक, नोव्हेंबर १९५४

## —लेखक-परिचय—

**प्रा. श्रीनिवास दीक्षित** – कोल्हापूर येथील 'राजाराम कॉलेज'मध्यें तत्त्वज्ञानाचे प्राध्यापक.

**डॉ. य. कृ. सोवनी** – वाङ्मय-आयुर्विद्याविशारद (टि. म. वि) – मुंबई येथील 'संयुक्तमहाराष्ट्र-परिषदे'चे कार्यवाह. 'संयुक्तमहाराष्ट्राची माहिती' या पुस्तकाचे लेखक.

**श्री. गणेश कुडे एम्. ए.** – अमळनेर येथील गं. स. हायस्कूलमध्यें शिक्षक. यांच्या कविता मराठी नियतकालिकांतून येत असतात.

**श्री. म. शं. जावडेकर एम्. ए.** – शेट तुळशीदास किलाचंद M. P. यांचे संसदीय चिटणीस. अर्थशास्त्राचे व्यासंगी लेखक.

**श्री. मधुकर घोलप ( पुणें )** – 'सुखाच्या शोधांत' या गद्यकाव्याचे लेखक.

**आचार्य स. ज. भागवत** – शिक्षण-शास्त्रज्ञ. गारगोटी ( कोल्हापूर ) येथील 'मौनी विद्यापीठा'चे कुलगुरु. 'आंतरभारती'चे संचालक. 'नवभारता'चे एक संपादक. 'जीवन आणि साहित्य', 'जीवनशिक्षण' इत्यादि पुस्तकांचे लेखक.

**श्री. मधु वाबगांवकर** बी. ए. -- (नागपूर). – यांच्या कविता मराठी नियतकालिकांतून येत असतात.

**प्रा. व. म. परांजपे** – मुंबई येथील 'रामनारायण रुईया कॉलेज'मध्यें इंग्रजीचे प्राध्यापक.

**श्री. पु ह. ऊर्फ रावसाहेब पटवर्धन** – मुंबईहून निघणाऱ्या 'साधना' साप्ताहिकाचे एक संपादक.

**प्रा. अमृतलाल भगवानजी याज्ञिक** – मुंबईच्या 'रामनारायण रुइया कॉलेजां'तील गुजरातीचे प्राध्यापक. गुजराती नियतकालिकांतून टीकात्मक व मानसशास्त्रविषयक लेखन.

**श्री. वि. के. महाबळेश्वरकर** – हिंगणें येथील महिलाश्रम हायस्कूलमध्यें शिक्षक.

**श्री. स. का. दीक्षित एम्. ए.** – नागार्जुनकोंडा ( जि. गंटूर ) येथील 'आर्केऑलॉजिकल म्युझिअम'चे कस्टोडिअन. 'Mother Goddess', 'सिंधु-नदीवरील संस्कृति' इत्यादि पुस्तकांचे लेखक.

अनुक्रमणिका

प्रा. श्रीनिवास दीक्षित

# सांख्यदर्शनाची स्वायत्तता

'नवभारता'च्या मार्च १९५४ च्या अंकांत श्री. दि. के. बेडेकर यांनीं सांख्यदर्शनांतील प्रकृति-पुरुष या द्वैतांत परंपरागत भारतीय समाज-जीवनाचा सांचा प्रतिबिंबित झाला आहे, अशी एक कल्पना मांडली आहे. त्यांचें म्हणणें थोडक्यांत असें : "समुद्रांत कितीहि खळबळ माजली तरी तो ज्याप्रमाणें आपली मर्यादा सोडून बाहेर येत नाहीं, त्याप्रमाणें आमच्या ग्रामव्यवस्थेंत जीवन कितीहि संकुल झालें तरी एकंदर ग्रामीण जीवनाचा सांचा स्थिर राहिला आहे. स्थिर-स्वरूपाच्या ग्रामसंस्थेवर तरंगत राहणारी संकोच-विकास-क्षम राजसत्ता हीच आमची समाजरचना. या व्यवस्थेंत उत्पादनाचा सारा भार ग्रामीण जनतेवर पडत असे. हेंच तें प्रकृतीचें तथाकथित कर्तृत्व. पण या उत्पादनाचा भोग मिळावयाचा तो मात्र राज-पुरुषास. हा पुरुष निष्क्रिय व (प्रजेच्या हितासंबंधीं) उदासीन असून केवळ उपभोगाचा स्वामी होता. सांख्यदर्शनांतील उदासीन, अकर्ता व केवळ सुख-दुःखांचा भोग घेणारा चेतन पुरुष म्हणजे समाज-वृक्षावरील बांडगूळ जो राजपुरुष त्याचें प्रतिबिंब होय".

बेडेकरांच्या या कल्पनेंत दोन सिद्धान्त ग्रथित आहेत. पैकीं पहिला आहे आमच्या समाजधारणे-विषयीं. 'राजानें आपल्या प्रजेच्या रक्षण-भरण-पोषणा-साठीं झटावें' हा विचार, त्यांच्या मतें, 'भारतीय समाजजीवनांत आगंतुक व क्षीण होता.' 'खास आमची अशी राज्यशास्त्रीय कल्पना म्हणजे राजा हा एकंदर समाजाच्या शिरोभागीं पण कर्तृत्वशून्य भोग-स्वामी आहे ही होय.'

बेडेकरांच्या या पहिल्या सिद्धान्ताविषयीं मला कांहींच म्हणावयाचें नाहीं. कदाचित् त्यांचें म्हणणें खरेंहि असेल. तो प्रश्न इतिहास-समीक्षेचा आहे.

पण त्यांचा दुसरा सिद्धांत तात्त्विक स्वरूपाचा आहे. तो मात्र मला सर्वस्वी नाकारावयाचा आहे. तो सिद्धान्त म्हणजे त्यांनीं कल्पिलेल्या ग्रामसंस्था व राज-सत्ता या द्वंद्वाचें प्रतिबिंब सांख्यदर्शनांत प्रकृति-पुरुष या द्वैताच्या रूपानें पडलें आहे हा होय.

मला असें निक्षून म्हणावयाचें आहे कीं सांख्य-दर्शनांतील साऱ्या सिद्धान्तांची उपपत्ति अगदी निराळी आहे. तें एक स्वायत्त व स्वयंपूर्ण जीवनदर्शन आहे. आपल्या उभ्या अनुभवराशीची व्यवस्था लावण्याचा तो एक नेटका प्रयत्न आहे. एका विशिष्ट वैचारिक वातावर-णांत, एका विशिष्ट पातळीवरून, एका विशिष्ट बिंदूपासून, एका विशिष्ट दिशेनें मानवी अनुभवाचें (कुठल्या तरी ठराविक स्थलकालांतील अथवा सामाजिक परिस्थितीं-तील माणसाच्या अनुभवाचें नव्हें, तर स्थल-काल-निरपेक्ष अशा मानवाच्या केवळ अनुभव-व्यवसायाचें) विश्लेषण आणि पुनस्संघटन करूं लागलें म्हणजे जे सिद्धान्त अनिवार्यपणें एकापुढें एक येतात त्यांचेंच ग्रथन सांख्यदर्शनांत झालें आहे. बेडेकरांच्या म्हणण्याचा परामर्श घेतांघेतांच सांख्यांचे प्रमुख सिद्धान्त एकमेका-पासून, केवळ तार्किक अनिवार्यतेमुळें, कसकसे उपपन्न होतात हें दाखविण्याचा मी प्रयत्न करणार आहे.

बेडेकरांच्या म्हणण्याप्रमाणें, स्थिर स्वरूपाची ग्राम-व्यवस्था व प्रजेविषयीं उदासीन पण स्वतःच्या हिता-विषयीं जागरूक असा निष्क्रिय, भोगस्वामी राजपुरुष (आणि त्याचा परिवार) या सामाजिक द्वंद्वाचें प्रतिबिंब सांख्यदर्शनांत (कीं दर्पणांत ?) प्रकृति-पुरुष या द्वंद्वा-च्या रूपानें पडलें आहे. याचा अर्थ इतकाच होईल कीं सांख्यदर्शन हें भारतीय समाज-जीवनावरील एक रूपक होय. पण मला वाटत नाहीं कीं जे लोक सामाजिक परि-स्थितींतून तत्त्वज्ञान निर्माण होतें असें मानतात त्यांच्या मतें तत्त्वज्ञान म्हणजे परिस्थितीचा केवळ आरसा होय. ते असें म्हणतात कीं तत्त्वज्ञान हें एक तर प्र-चलित समाजव्यवस्थेचें समर्थन असतें, अथवा प्रचलित समाजव्यवस्था मोडून नवी रचना करण्यास आवाहन असतें. उदाहरणार्थ, बौद्ध दर्शनासंबंधीं असें म्हणतां

येईल कीं यज्ञयागावर आधारलेल्या ब्राह्मणी समाजरचनेवर आघात करून नवीन सांस्कृतिक मूल्यास आवाहन करणें हें त्याचें ऐतिहासिक कार्य होतें. पण केवळ समाजव्यवस्थेवर रूपक रचण्याकरितां कोणी तत्त्वज्ञानाचा खटाटोप करीत नाहींत. तें काम एखाद्या लहानशा कवितेंतहि होऊन जाईल.

## उपमेचा रोख

श्री. बेडेकरांची कल्पना ही अशीच कविकल्पना आहे. या कल्पनेस मुख्य आधार म्हणजे 'सांख्यकारिका'वरील टीकाकार वाचस्पतिमिश्र यानें ३६ व्या कारिकेवर टीका लिहितांना वापरलेली एक उपमा. ही कारिका खुद्द वाचस्पतिमिश्राच्या मतें ज्ञानप्रक्रियेंत इंद्रियें, मन व अहंकार या सर्वांहून बुद्धीचें श्रेष्ठत्व सांगण्याकरतां रचली आहे. व हीच गोष्ट स्पष्ट करण्याकरतां, वाचस्पतीनें आपल्या उपमेंत त्यांचें परस्परांशीं संबंध अनुक्रमें, गांवपाटील, सरसुभे, कोशाध्यक्ष व सुभेदार यांच्याप्रमाणें चढत्या भांजणीचे आहेत असें वर्णिलें आहे. बेडेकर लिहितात त्याप्रमाणें ही कारिका अथवा तिच्या स्पष्टीकरणार्थ वापरलेली उपमा "प्रकृति व पुरुष ··· या दोन तत्त्वांचा संयोग होण्यानेंच एकीकडे विश्वाचा पसारा निर्माण होतो व दुसरीकडे पुरुषाला भोग व मोक्ष साधतां येतो ही गोष्ट स्पष्ट करण्याकरतां" नव्हे. यासंबंधींची वाचस्पतीची भाषा अगदी निःसंदिग्ध आहे. ३६ व्या कारिकेस सुरवात करण्यापूर्वीच तो लिहितो : "न केवलं बाह्यानींद्रियाण्यपेक्ष्य प्रधानं बुद्धिः, अपि तु येऽप्यहंकारमनसी द्वारिणी तेऽप्यपेक्ष्य बुद्धिः प्रधानमित्याह—." ज्याला थोडें बहुत संस्कृत समजतें अशा कुठल्याहि वाचकानें वाचस्पतीच्या 'तत्त्वकौमुदी' या ग्रंथांतील ३६व्या कारिकेच्या वरील (आतांच उद्धृत केलेली) व खालील टीका पाहून यासंबंधीं आपली खात्री करून घ्यावी. त्याकरतां कुठल्याहि चर्चेची जरूरी नाहीं अथवा चर्चेस अवकाशहि नाहीं. वाचस्पतीच्या उपमेंत राजाचा उल्लेख आला आहे खरा. पण तो अगदींच आपाततः. सांख्यदर्शनांतील पुरुष-तत्त्व हें राजपुरुषाप्रमाणें उदासीन व भोगप्रिय आहे हें सांगण्याचा उपमेचा रोख मुळीं नाहींच. तरीसुद्धां बेडेकरांना ही उपमा 'मोठी सूचक' वाटते व या सूचकतेनें भारून जाऊन ते एक सबंध सिद्धान्त मांडूं पाहतात. बेडेकरांना वाटतें त्याप्रमाणें या उपमेंत साऱ्या सांख्यदर्शनाचें बीज असतें तर ही एवढी मौलिक उपमा सांख्यदर्शनाचें निरूपण करतांना अनेकांनीं वापरली असती. एका टीकाकारानें एकदांच उपयोग करून तिच्यांतील आशय संपून जावा असें झालें नसतें. विशेष अर्थवाहक उपमा अथवा उदाहरण सातत्यानें वापरीत जावयाचें हा तर भारतीय दर्शनवाङ्मयाचा शिरस्ता आहे.

पण हा मुद्दा आपण सोडून देऊं. लेखकाच्या ध्यानींमनीं नसतांना अगदीं अभावितपणें त्याच्या लिखाणांतून एखाद्या वाचकास एक नवीनच अर्थ स्फुरला तर त्यांत कांहीं हानि नाहीं. खरा महत्त्वाचा प्रश्न हा कीं बेडेकरांनीं विणून काढलेल्या अर्थाचे हे सणंग सांख्यदर्शनास ठाकठीक बसतात कीं नाहीं ? ते अगदींच बेडौल दिसतात असें मला म्हणावयाचें आहे. बेडेकरांनीं कल्पिलेला उदासीन राजपुरुष व सांख्यदर्शनांतील उदासीन असें पुरुषतत्त्व यांत कांहींच साम्य नाहीं. व तीच गोष्ट भारतीय जानपदसमाज व सांख्यांची प्रकृति यांच्यांतील संबंधाची होय. कसें तें पाहूं.

## सांख्यांच्या पुरुषाचीं वैशिष्ट्यें

सांख्यांच्या पुरुषाचीं चार वैशिष्ट्यें आहेत. तीं म्हणजे : (१) पुरुष अनेक आहेत. (२) पुरुष चेतन आहे. (३) तो निर्गुण आहे. व (४) तो निष्क्रिय आहे——हीं होत. हीं क्रमवार घेऊन यांपैकीं कुठलेंच बेडेकरांच्या उदासीन राजपुरुषाशीं जुळत नाहीं, हें मी आतां दाखविणार आहे.

पुरुष अनेक आहेत असें सांख्यदर्शन जातां जातां सांगत नाहीं तर त्यासंबंधीं त्याचा पुरेपुर आग्रह आहे. पुरुष अनेक कां मानावयाचे याची भरपूर कारणमीमांसा त्या दर्शनांत आहे व या मुद्द्यावर अद्वैतवेदांताशीं सांख्यांचें कडाक्याचें भांडण आहे. आतां, सांख्यांचा पुरुष हा जर प्रच्छन्नपणें समाजवृक्षावरील बांडगूळ जो राजपुरुष तो असता, तर पुरुषाच्या अनेकत्वावर इतका भर देण्याचें सांख्यदर्शनास कांहींच प्रयोजन नव्हतें. उलट, अद्वैत-वेदांताप्रमाणें, सर्वान्तर्यामी एकच पुरुष आहे असें मानून सामन्तचक्रानें वेष्टित असा राजपुरुष हें त्या परमपुरुषाचें प्रकट व प्रकृष्ट स्वरूप आहे असें सुचविणें अधिक साहजिक झालें असतें. सांख्यदर्शन चुकूनहि या विचाराकडे झुकलें

नाहीं. सांख्यदर्शनानें प्रत्येक व्यक्ति, मग ती राजपुरुष असो वा गांवगाड्यांतील बलुतेदार असो, एक स्वयंभू व स्वतःकरताच अस्तित्वांत असणारा ' पुरुष ' मानली आहे. प्रत्येक व्यक्तीला स्वतंत्र अस्तित्व आहे. थोडक्यांत म्हणजे, एक व्यक्ति दुसऱ्या व्यक्तीचें साधन नव्हें. पुरुषबहुत्वाच्या सिद्धांतांतून कांहीं सामाजिक आशय काढूं म्हटल्यास तो हाच निघेल. व हा तर बेडेकरांच्या कल्पनेशीं सर्वस्वीं विरोधी आहे.

## सांख्यांचें चेतन व अचेतन

दुसरी गोष्ट पुरुषाच्या चेतनत्वासंबंधीं. सांख्यांचा पुरुष हा चेतन आहे. व त्याउलट, प्रकृति ही अचेतन आहे. ज्याला आपण आज बौद्धिक अथवा मानसिक व्यापार म्हणूं त्यांनाहि सांख्यांनीं अचेतन प्रकृतीचेच विकार मानलें आहे. व याचें बेडेकरांना मोठें कोडें पडलें आहे. प्रकृति अचेतन असतांहि ज्या अर्थीं सर्व मनोव्यापारांना प्राकृतिक मानलें आहे त्याअर्थीं ' अचेतन ' ( व अर्थात् ' चेतन ' ) यांचे सांख्यांच्या परिभाषेंतील अर्थ रूढार्थाहून भिन्न असले पाहिजेत असा बेडेकरांनीं निष्कर्ष काढला. म्हणून थोडें विषयांतर करून ते सांगतात कीं आजच्या विज्ञानांत ज्यास जडपदार्थ अथवा ' मॅटर ' म्हणतात, त्यांत आणि सांख्यांच्या प्रकृतींत कांहींच साम्य नाहीं.

मग चेतन व अचेतन यांचे सांख्यदर्शनांतील खरे अर्थ तरी कोणते बेडेकरांनीं शोधून काढले आहेत ? प्रकृतीपासून नानाविध सृष्टि उत्पन्न होण्यास आवश्यक असणारा प्रकृति व पुरुष यांचा संयोग वर्णन करण्याकरतां सांख्यांनीं त्यास आंधळा व लंगडा यांच्या सहकाराची उपमा दिली आहे. प्रकृति आंधळी आहे. पण ती वाट चालूं शकते. पुरुष डोळस आहे, पण तो आयतोबा. प्रकृतीच्या पाठीवर बसून आपणास इष्ट त्या ठिकाणीं नेण्यास तो प्रकृतीला राबवीत असतो. झालें ! बेडेकरांना अर्थ मिळाले. आंधळी प्रकृति म्हणजे ' मुकी बिचारी कुणी हांका ' अशी ग्रामीण जनता व डोळस पुरुष म्हणजे स्वतःच्या स्वार्थाकरतां या जनतेस राबविणारा राजपुरुष.

हा त्यांचा अर्थ दृढ करण्यास क्रमांक दोनचा मुद्दा म्हणून बेडेकर आपल्या असें लक्षांत आणून देतात कीं सांख्यांच्या मतें प्रकृति आपला सारा पसारा पुरुषाच्यासाठीं मांडीत असते, स्वतःसाठीं नाहीं. तेव्हां अचेतन जड प्रकृति म्हणजे ग्रामव्यवस्थेच्या स्थिर चाकटींत राहून सदोदित दुसऱ्याकरतां ( राजपुरुषास करभार देण्याकरतां ) श्रमणारी जनता. व याच्या उलट, चेतन पुरुष म्हणजे स्वतः श्रम न करतां केवळ भोग घेणारा राजपुरुष.

पुरुषाच्या चेतनत्वाच्या या अर्थाच्या पुष्ट्यर्थ तिसराहि एक आधार बेडेकरांनीं दिला आहे. " परचक्राची व अंतःस्थ कारस्थानाची भीति राजाला एकसारखी भेडसावीत असे. ( म्हणून ) राजमंडळाचें राजधानींतील जीवन हें एका अर्थानें ' चेतन ' म्हणजे अखंड जागरूकतेचें असणें प्राप्त आहे. "

' चेतन ' व ' अचेतन ' यांच्या अर्थांची बेडेकरांनीं उभी केलेली ही तीनमजली इमारत अगदींच ठिसूळ पायावर आधारलेली आहे. तसेंच प्रत्येक मजलाहि कच्च्या बांधणीचा आहे.

आपण तिच्या पायापासूनच सुरवात करूं.

आपले सारे मानसिक व्यापार जर प्रकृतीचे विकार तर प्रकृति अचेतन कशी ही शंका बेडेकरांच्या एकंदर विचारसरणीस पायाभूत आहे. तेव्हां त्या शंकेस प्रथम उत्तर देतों.

इतर कुठल्याहि तत्त्वचिंतकाप्रमाणें सांख्यांनीं ज्ञानप्रक्रियेचें विश्लेषणात्मक परीक्षण सुरू केलें व त्याचें फलित म्हणून त्यांना असें आढळून आलें कीं ज्ञानप्रक्रियेंत एका बाजूस, चल असा अंतःकरणाचा व्यापार व दुसऱ्या बाजूस दीपग्रहाप्रमाणें अखंड निश्चल असें एक चेतन तत्त्व, अशा दोन भिन्न गोष्टी अंतर्भूत आहेत. सांख्यांच्याच पद्धतीप्रमाणें हें विश्लेषण येथें देतों.

समजा, समोरील घट रक्त आहे असें ज्ञान मला झालें. हें ज्ञान सिद्ध होण्यासाठीं काय काय गोष्टी न्यायतः प्राप्त होतात तें आपण सांख्यांच्या रीतीनें पाहूं.

प्रथम समोर घट असला पाहिजे व त्याच्याठिकाणीं रक्त हा गुण असला पाहिजे. हे अर्थात्, विषय म्हणजे जाणले जाणारे होत. हे चेतन आहेत असें म्हणण्यास आधार नाहीं. कारण, चेतनाचें अस्तित्व स्वयंसिद्ध असतें. पण घट व त्याचा रक्त हा गुण यांच्या अस्तित्वाची सिद्धि त्यांच्या ज्ञानामुळेंच होते.

पण केवळ समोर घट व घटाच्या ठिकाणीं त्याचा

रक्त हा गुण एवढ्यानें काम भागणार नाहीं. 'रक्त घट' या आकाराचें ज्ञान घडण्यास माझ्या इंद्रियांच्याद्वारा रक्तगुणविशिष्ट घटाचें निर्विकल्प रीतीनें (म्हणजे नामजातिविरहित असें) ग्रहण झालें पाहिजे. नंतर मनानें हें निर्विकल्प ज्ञान निरनिराळ्या विकल्पांच्या रूपानें सजावट करून मांडलें पाहिजे. पण कुठलेंहि ज्ञान व्यक्तिनिरपेक्ष नसतें. तें कुणाचें तरी असतें. 'अहंता' हा ज्ञानाचा अविभाज्य भाग असतो. म्हणून मनानें तयार केलेला संकल्पविकल्पात्मक ज्ञानाचा लगदा अहंकारापुढें येतो व त्यावर त्याचा शिक्का बसतो. पण अद्याप ज्ञानाचा आकार (म्हणजे ही समोरील घट वस्तु रक्त आहे हें ज्ञान) निश्चित झालेला नसतो. अहंकारानें स्वीकृत केलेल्या अनेक विकल्पांतून ज्ञानाचा अमुकच एक आकार निश्चित करण्याचें काम बुद्धि करते. बुद्धि, अहंकार व मन या तिहींना मिळून सांख्यदर्शनांत अंतःकरण म्हणतात. हें लक्षांत घेऊन, आतांपर्यंत केलेल्या विश्लेषणांतून निघालेले घटक थोडक्यांत असे सांगतां येतील: (क) समोर खरोखर घट असून त्याच्या ठिकाणीं रक्त हा गुण असणें. (ख) इंद्रियद्वारा त्यांचें ग्रहण होऊन त्यांवर अंतःकरणाची कांहीं एक विशेष क्रिया घडणें. पण एवढें झालें म्हणजे ज्ञान झालें असें होत नाहीं. वर वर्णन केलेली अंतःकरणाची क्रिया एक यांत्रिक घटना आहे. ज्याप्रमाणें (आजच्या परिभाषेंत) रंगसंवेदनेच्या वेळीं मेंदूत व मज्जातंतूंत नियमानें होणाऱ्या हालचाली म्हणजे रंगसंवेदना नव्हे— त्या दोहोंत अनुल्लंघनीय दरी राहणारच— त्याप्रमाणें अंतःकरणाचें कार्य व निष्पन्न होणारें ज्ञान यांतील अंतर अनुल्लंघनीय आहे. हा फरक आपण जाणूं शकतों. ज्यांची सिद्धि ज्ञानावर अवलंबून आहे अशी वस्तु व तिचे व्यापार आणि ज्याचें अस्तित्व स्वयंसिद्ध आहे असें त्या वस्तूचें ज्ञान यांतील मूलभूत फरक सांगण्यासाठी आपण म्हणतां कीं वस्तु व तिचे व्यापार हे जड आहेत, प्राकृतिक आहेत, पण ज्ञान हें चैतन्ययुक्त आहे. ज्ञानांत हा जो चैतन्याचा अंश आहे तो घट, रक्त, अंतःकरणाचे व्यापार इत्यादि ज्ञानघटकांपासून अगदींच विलक्षण असल्यानें सांख्यांनीं, त्याचा आश्रय म्हणून, जड (म्हणजे विषयीभूत) प्रकृतीपासून अत्यंत विलक्षण असें 'पुरुष'-तत्त्व कल्पिलें आहे. पुरुषाचा स्थिर प्रकाश (आलंकारिक अर्थानें) अंतःकरणरूपी गतिमान् उपकरणावर परावर्तित झाला म्हणजे ज्ञानाची किमया घडून येते. एखादी रूपवती स्त्री अंधारांत कितीहि नटून सजून बसली तरी जोंपर्यंत प्रकाशाचा झोत तिच्या अंगावर पडत नाहीं तोंपर्यंत तिचें सौंदर्य ज्याप्रमाणें एका अर्थानें सौंदर्यच नव्हें, त्याप्रमाणें ज्यावर पुरुषाचा प्रकाश परावर्तित झाला नाहीं अशा केवळ अंतःकरणाच्या क्रिया (= मनोव्यापार) ज्ञान या पदवीस पात्र नाहींत. या नुसत्या अंतःकरणाच्या यांत्रिक क्रिया म्हणजेच ज्यांना जड म्हटलें आहे असे मनोव्यापार होत. वर दिलेला हा सर्व विचार आचार्य विनोबा भावे यांनीं आपल्या 'विचारपोथी' या पुस्तकांत एकाच वाक्यांत सांगून टाकला आहे. तें वाक्य असें: "जगामुळें 'जगाच्या', डोळ्यांमुळें 'रूपाचें', बुद्धीमुळें 'ज्ञान', आत्म्यामुळें 'होतें'." (विचार, क्रमांक १७८).

असो. हें एवढें सांगितलें तें अशाकरतां कीं आपल्या मानसिक व्यापारांना सांख्यदर्शनांत अचेतन (जड) म्हटल्यामुळें बेडेकरांना मोठें कोडें पडलें आहे व त्यांतून मार्ग काढण्यासाठी ते चेतन व अचेतन यांचे निराळेच कांहीं अर्थ काढण्यासाठीं युक्तिवादाचे जिन्यावर जिने चढवीत आहेत, तें त्यांनीं करूं नये म्हणून. बेडेकरांना अर्थांचा असा निराळा इमला रचण्याचें कारण नाहीं. सांख्यांनीं मनोव्यापारास अचेतन मानलें तें युक्तिवादाचें फलित म्हणून; भलत्या नांवाखालीं भलताच अर्थ चोरून तत्त्वज्ञानाच्या सरहद्दींत घुसडावा म्हणून नव्हे.

चेतन व अचेतन यांचे अनुक्रमें भोगस्वामी राजपुरुष व राबणारी जनता असे भिन्न अर्थ घेण्याकरतां बेडेकरांनीं रचलेल्या तीनमजली इमारतीस पायाच नाहीं—म्हणजे तसे अर्थ काढण्यास कांहीं प्रयोजन नाहीं असें आपण पाहिलें. आतां त्यांनीं काढलेले अर्थ कितपत लागूं पडतात व त्याकरतां मांडलेले युक्तिवाद कितपत निर्दोष आहेत हें पहावयाचें.

### अंध-पंगु-सहकाराच्या उपमेचा आशय

आपल्या विशिष्ट अर्थांचा पाठपुरावा करण्यासाठीं त्यांनीं पहिला आधार घेतला—त्यांच्या इमारतीचा १ ला मजला— तो म्हणजे प्रकृतींतून क्रमानें सृष्टि उत्पन्न

होण्यास अवश्यंभावी अशा प्रकृति व पुरुष यांच्या संयोगास सांख्यांनीं दिलेली आंधळा व पांगळा यांच्या सहकाराची उपमा. बेडेकर म्हणतात कीं आंधळी प्रकृति म्हणजे राजपुरुषाकरतां सदोदित श्रमणारी जनता. व हिच्या पाठीवर स्वार होऊन आपल्या मर्जीनुरूप तिला इकडेतिकडे खेंचणारा लंगडा पुरुष म्हणजे उत्पादक श्रम न करतां भोगविलास करणारा राजपुरुष.

यावर पहिला आक्षेप असा कीं प्रकृतिपुरुषसंयोगाकरतां सांख्यांनीं योजिलेल्या दृष्टान्ताचा गर्भित अर्थ जर अशा प्रकारचा असेल तर कुठल्याहि टीकाकारानें अथवा भाष्यकारानें तसें चुकूनहि कां सुचविलें नाहीं ? कुठल्याहि उपमा-दृष्टान्ताचा निघेल तितका कीस काढावयाचा अशी भाष्यकारांची पद्धत होती. यावर शंका काढली जाईल कीं लेखकाला ज्याची जाणीव नसते असा सामाजिक आशय त्याच्या लिखाणांत दडून राहिलेला असतो व मार्क्सवादी पद्धतीनें ( मार्क्सवाद म्हणे तत्त्वज्ञान किंवा पंथ नसून केवळ अभ्यासाची एक रीत आहे ! ) त्या लिखाणाचा अभ्यास केल्यास तो सुप्त आशय खडबडून जागा होऊन स्वतःच बोलूं लागतो. हें मत जरी मान्य केलें तरी त्यामुळें बेडेकरांनीं काढलेल्या अर्थास पुष्टि मिळत नाहीं. कारण खुद्द मार्क्सवाद्यांच्याच मतें एकाद्या लिखाणाचा सामाजिक आशय अर्थवादात्मक असतो— म्हणजे एक तर तें लिखाण गर्भित प्रशंसेच्या द्वारें प्रचलित समाजपद्धति उचलून धरील अथवा प्रचलित समाजपद्धतीच्या गर्भित निन्देच्या द्वारें नवीन सामाजिक मूल्यांस आवाहन करील; निन्दाप्रशस्तिविरहित समाजपरिस्थितीचें केवळ रूपकात्मक वर्णन करणार नाहीं. कट्टर मीमांसकानें एकाद्या वेदवाक्याचा अर्थ विधिनिषेधपर नसून केवळ वर्णनात्मक आहे असें म्हणण्यांत जितका धर्मलंडपणा आहे, तितकाच मार्क्सविरोध एकाद्या लिखाणाचा गर्भित सामाजिक आशय, समाजपरिस्थितीचें वस्तुनिष्ठ वर्णन करण्यांत आहे.

पण हाहि मुद्दा आपण सोडून देऊं. आपण इतकाच विचार करूं कीं प्रकृतिपुरुषसंयोगास जी अंधपंगुसहकार्याची उपमा दिली गेली त्यांत कांहीं विशेष प्रयोजकता आहे, कीं बेडेकर म्हणतात त्याप्रमाणें श्रमिक जनता व भोगस्वामी राजपुरुष या सामाजिक विरोधाचा केवळ निर्देश करणें हें तिचें काम होय ! बेडकरांच्या मताचा कितीहि सहानुभूतीनें विचार केला तरी दूरान्वयानें अथवा अल्पांशानेंहि मला तें ग्राह्य वाटत नाहीं. कारण त्या उपमेचें सार्थक्य सर्वस्वीं भिन्न गोष्टींत आहे हें अगदी उघडउघड दिसतें. सांख्यदर्शनांतील कांहीं मूलभूत सिद्धान्त वा गृहीतकृत्यें व त्यांची विशिष्ट मांडणी यामुळें कांहीं अडचणी निर्माण होतात. त्या अडचणींचा परिहार करण्यास प्रकृति व पुरुष यांचा कांहीं विशेष संबंध ते सांगूं पहातात व त्या विशेष संबंधाची कल्पना देण्यास त्यांनीं अंध-पगुसहकार्याची उपमा वापरली आहे. या उपमेनें त्यांना आलेल्या अडचणीचें निवारण होतें, असें मला म्हणावयाचें नाहीं. ( त्या अडचणीचा परिहार होत नाहीं हा तर सांख्यदर्शनावर अनेकांनीं घेतलेला सर्वांत मोठा आक्षेप आहे. ) मला म्हणावयाचें इतकेंच कीं त्यांच्या अडचणींतून मार्ग काढण्यास त्यांनीं शोधून काढलेला हा दृष्टान्त जास्तींत जास्त उपयोगी आहे. या मुद्द्याचाच विचार आतां करूं.

## विश्वाची दोन भागांत विभागणी

वर सांगितलेल्या ज्ञानप्रक्रियेच्या विश्लेषणाच्या आधारावर सांख्यांनीं एकंदर विश्वाची विभागणी दोन भागांत केली. एक भाग म्हणजे जो ज्ञानाचा कधींच विषय होत नाहीं, पण ज्याच्याविना ज्ञान संभवत नाहीं असें पुरुषतत्त्व. पुरुष अनेक आहेत असें त्यांनीं मानलें. ( त्यासंबंधीची कारणमीमांसा आपणास प्रस्तुत नाहीं. ) हे पुरुष अर्थात् चेतन होत. दुसऱ्या भागांत जें जें ज्ञानाचा केवळ विषय होऊं शकतें तें सर्व घातलें व त्यास प्रकृति असें नांव दिलें. प्रकृतीस ज्ञान होत नसल्यानें ती अचेतन होय. अशा रीतीनें एकंदर विश्वाचा पुरुष व प्रकृति अशा दोन तत्त्वांत विभाग झाला.

पुरुष व प्रकृति या विभागणीमध्यें आणखी एक उद्देश दडून बसला आहे. ' दडून ' असें म्हणण्याचें कारण हें कीं सांख्यांनीं प्रकटपणें तो कधींच पुढें मांडला नाहीं. पण ' बसला आहे ' असें म्हणण्यास आधार हा कीं तो गृहीत धरून सांख्यदर्शनाचा अन्वय अधिक चांगला लागतो व वैदिक परंपरेशीं त्याची नीट सांगड घालतां येते. तो उद्देश असाः अखिल विश्वासंबंधीं जेव्हां तात्त्विक विचार सुरूं होतो, तेव्हां प्रथमच लक्षांत येणारी गोष्ट ही कीं आपल्यापुढें दिस-

णारें सारें जग एकसारखें बदलत आहे. पदार्थांचीं रंग-रूपें क्षणोक्षणीं पालटत आहेत. किंबहुना वस्तूंच्या 'दृष्ट-नष्ट' स्वरूपामुळेंच तात्त्विक विचाराचा उगम होतो. ज्या आश्चर्यांतून तत्त्वज्ञानाचा जन्म होतो असें प्लेटोनें म्हटलें आहे तें आश्चर्य हेंच होय. अमुक एक पदार्थ आपण ' आहे ' असें म्हणतो पण जरा पाहूं जातां त्याच्या सतत बदलत्या नामरूपाशिवाय हातीं कांहींच लागत नाहीं. हेंच आश्चर्यांतील आश्चर्य साऱ्या तात्त्विक विचाराची गंगोत्री होय. उपनिषत्कालीं झालेल्या तात्त्विक विचारमंथनांतून, या क्षणोक्षणीं बदलणाऱ्या नाम-रूपास आधार म्हणून एक नित्य तत्त्व आहे असा सिद्धान्त निघाला. या नित्य तत्त्वास वैदिक ऋषींनीं आत्मा अथवा पुरुष असें नांव दिलें. यांतून निघणारा पुढचा तात्त्विक प्रश्न असा कीं नित्य असें वस्तुतत्त्व जो आत्मा व आपणास दिसणारीं बदलतीं नामरूपें यांचा परस्पर संबंध काय ? हा संबंध उपनिषदांत भिन्न भिन्न रीतींनीं ( इतकेंच नव्हे तर एकमेकांस विरोधी रीतींनीं) सांगण्यांत आला. त्यांतील एका रीतीची परि-णति म्हणजे अद्वैतवेदान्त. अद्वैत-वेदांतानें सांगून टाकलें कीं नामरूपें मुळीं मिथ्याच; त्यामागील नित्य आत्म-तत्त्व तेवढेंच खरें; हाच त्या दोहोंचा संबंध. प्रश्न सोड-विण्याची ही तऱ्हा सांख्यांना अघोरी वाटली ( असें आपण म्हणूं ). म्हणून त्यांनीं दुसऱ्या एका रीतीचा अवलंब केला. त्यांनीं एक 'ऑपरेशन' केलें. नामरूपें मिथ्या म्हणून हात झटकण्याऐवजीं त्यांनीं तीं कापून एका बाजूस काढलीं व त्यांचा एक गठ्ठा केला. तीच सांख्यांची प्रकृति. ही बाजूस काढल्यावर जें अचल तत्त्व राहिलें तो पुरुष होय. या उद्देशानें प्रकृति-पुरुष-विभाग सिद्ध झाल्यावर, नामरूपात्मक जी प्रकृति ती मिथ्या न मानल्यानें तिची नीट व्यवस्था लावणें प्राप्त आलें. ही व्यवस्था लावावयाची म्हणजे तिच्या निरनिराळ्या अवस्थांचा कांहीं क्रम दाखवा-वयाचा, त्यांची कांहीं संगति लावायची. ही संगति लावतांना त्या वेळच्या विचारपद्धती-अनुसार सृष्टीच्या नाना व्यवहारांत कांहीं योजना आहे, हेतु-पूर्वकता आहे असें ते मानून बसले. यांतून एक मोठी अडचण निर्माण झाली. हेतु, योजना, उद्देश, इच्छा हीं केवळ चेतनालाच म्हणजे, या ठिकाणीं, पुरुषा-लाच संभवतात. पण हे उद्देश सिद्धीस जाण्यास या योजना मार्गी लागण्यास जी हालचाल, जें कर्तृत्व, जी क्रियाशीलता लागते ती पुरुषाच्या ठिकाणीं संभवत नाहीं. कारण पुरुष जर क्रियाशील राहील तर तो सतत बदलणारा अतएव अनित्य होईल. या अनि-त्यता-दोषापासून वांचविण्यासाठीं तर पुरुषाची प्रकृती-पासून फारकत केली. तेव्हां क्रियाशीलता राहिली केवळ प्रकृतीच्या ठिकाणीं आणि योजना अथवा प्रवृत्ति राहिली पुरुषापाशीं. पण प्रवृत्ति आणि कर्तृत्व, हेतु आणि हालचाल हीं एकत्र असल्याविना योजना-पूर्वक व्यवहार अशक्य होत. मग प्रकृति व पुरुष वेगवेगळे ठेवून विश्वाची योजनाबद्ध उभारणी व संहारणी यांचा अन्वय कसा लावायचा ?

सांख्यदर्शनातील सर्वांत मोठी अडचण म्हणून म्हटली ती हीच. पुरुष व प्रकृति यांचा विभक्तपणा कायम ठेवून पुरुषाच्या अचलत्वाला व प्रकृतीच्या अ-चेतनत्वाला बाध न येईल अशा रीतीनें सृष्टिव्यवहाराची उपपत्ति सांख्यांना लावावयाची होती व ती लावण्या-करता त्यांना दृष्टांत पाहिजे होता. दृष्टांतानें त्यांना असें दाखवावयाचें होतें कीं जी वस्तु स्वतः चेतन नाहीं म्हणजे जिचें स्वतःचें असें कांहीं उद्दिष्ट नाहीं, अशा वस्तूच्या ठिकाणीं दुसऱ्या कुठल्यातरी ( अचल ) वस्तूच्या उद्दिष्टासाठीं हालचाल, क्रियाशीलता संभवते. हें दाखविण्याकरतां ' सांख्य-कारिकें'त एकंदर तीन दृष्टांत दिले आहेत. अंधपंगु-सहकार हा या तिहींपैकीं एक होय. आंधळ्याच्या पाठीवर स्वार झालेला लंगडा माणूस स्वतः चालूं शकत नाहीं, पण त्यास अमुक एका स्थळीं पोंचावें असें उद्दिष्ट असूं शकतें. त्याचें हें उद्दिष्ट त्याहून भिन्न जो आंधळा माणूस त्याच्या ठिकाणीं विवक्षित दिशेनें चालण्याची क्रिया घडवून आणूं शकतें. याच न्यायानें सांख्य म्हणतात, प्रकृतीहून भिन्न जो पुरुष त्याच्या प्रयोजनार्थ प्रकृतीमध्यें हालचाल संभवेल.

सांख्यांचा हा युक्तिवाद चुकीचा आहे. कारण आंधळ्यास स्वतःचें कांहीं प्रयोजन असतें म्हणूनच तो लंगड्यासह वाटचाल करतो. पण प्रकृतीस कांहीं प्रयोजन असूंच शकत नाहीं. तेव्हां प्रस्तुत उदाहरणां-तील आंधळेपणा हें प्रकृतीच्या अचेतनत्वाचें म्हणजे हेतुशून्यतेचें प्रतीक होऊं शकत नाहीं. म्हणून दृष्टान्त समर्पक नाहीं.

पण हा मुद्दा वेगळा. सांख्यांनीं आपलें म्हणणें कितपत सिद्ध केलें याशीं आपणांस कांहीं कर्तव्य नाहीं. आपणास इतकेंच पहावयाचें आहे कीं हा अंध-पंगु-सहकाराचा दृष्टान्त कांहीं तार्किक उपपत्ति बसवण्यासाठीं आहे कीं बेडेकर म्हणतात त्याप्रमाणें निष्क्रिय राजपुरुष व राबणारी जनता यांचें द्वंद्व सूचित करण्याकरतां आहे. केवळ तार्किक आणि तात्त्विक कारणासाठींच हा दृष्टान्त आला आहे असें दाखविण्याचा प्रयत्न मी केला आहे. प्रकृति आंधळी आहे याचा अर्थ अमुक एक आपलें उद्दिष्ट असें ती पाहूं शकत नाहीं. ती जड अथवा मॅटर आहे. पुरुष डोळस आहे म्हणजे त्यास उद्दिष्टाची जाणीव आहे, म्हणजेच तो चेतन आहे. प्रकृतीचा आंधळेपणा व पुरुषाचा डोळसपणा यांचे हे अर्थ अगदी उघड आहेत, सरळ आहेत, बोलके आहेत. ते सोडून त्यांतून सामाजिक आशय काढूं पाहणें हें मार्क्सवादास धरून असेल, पण युक्तिवादास धरून नाहीं.

हा अंध-पंगु-सहकाराचा दृष्टान्त ज्या ठिकाणीं आला आहे त्याच ठिकाणीं गाईच्या स्तनांतील अचेतन दूध चेतन असें जें वासरूं त्याच्या हितार्थ स्रवतें व अचेतन लोहकण अचल अशा चुंबकाच्या शक्तीमुळें गतिमान् होतात असे आणखी दोन दृष्टान्त (पहिल्या इतकेच निरुपयोगी) आले आहेत. प्रकृति-पुरुषाची कल्पना जर कांहीं सामाजिक द्वंद्वावर उभारली असेल तर या दोन दृष्टांतांतूनहि ती कां निघूं नये ?

अचेतन प्रकृति म्हणजे दुसऱ्याकरतां राबणारी ग्रामीण जनता व चेतन पुरुष म्हणजे भोगपरायण राजपुरुष हे अर्थ बसविण्यासाठीं बेडेकरांचा क्रमांक दोनचा आधार म्हणजे प्रकृतीचे सारे व्यवहार पुरुषासाठीं होतात हा सांख्यांचा सिद्धांत. पण चेतन व अचेतन यांचे रूढ व सर्वमान्य अर्थ घेतल्यानेंहि सांख्यांच्या या म्हणण्याचा नीट बोध होतो, इतकेंच नव्हे तर रूढ अर्थ घेतल्यानें प्रकृति आपला पसारा पुरुषासाठीं मांडते असें म्हणणें अनिवार्य होतें. प्रकृति अचेतन मानल्यानें तिच्या चेष्टांना कांहीं उद्दिष्ट संभवत नाहीं. पण प्रकृतीचा सारा पसारा तर योजनाबद्ध दिसतो. तेव्हां ही योजना पुरुषासाठीं, पुरुषाच्या पुरुषार्थासाठीं असली पाहिजे. प्रकृतीचे सारे व्यवहार पुरुषासाठीं असतात, असें म्हणणें हें दार्शनिक दृष्ट्या अगदीं सुसंगत आहे.

## जागरूक कीं जागृत

पुरुष चेतन आहे याचा अर्थ तो राजपुरुषाचें प्रतिबिंब आहे हा आपला अर्थ सिद्ध करण्यास बेडेकरांनीं तिसरा एक मुद्दा ( त्यांच्या इमारतीचा शेवटचा मजला ) मांडला आहे. परचक्र व अंतःस्थ बंडाळी यांच्या भीतीमुळें राजास स्वतःचें आसन सांभाळण्यासाठीं सदोदित जागरूक रहावें लागतें. ही त्याची जागरूकता म्हणजेच पुरुषाचें चेतनत्व हें म्हणणें निखालस चूक आहे. कारण राजपुरुषाच्या या जागरूकतेंत क्रियाशीलता आहे. क्रियेचा उपशम नाहीं. सांख्यांचा पुरुष हा निश्चल, स्थिर, उदासीन व अकर्ता आहे. तो जागरूक असतो असें म्हणतांच येणार नाहीं. तो जागृत असतो हें म्हणणें ठीक होईल. पण जागृत असणें व जागरूक असणें यांत महदंतर आहे. या ठिकाणीं केवळ शब्दसाम्यामुळें बेडेकर फसले असें म्हणणें भाग आहे.

असो. अशा रीतीनें व इतक्या विस्तारानें सांख्यांच्या पुरुषाचें चेतनत्व व राजपुरुष यांचा अर्थाअर्थी कांहीं संबंध नाहीं असें पाहिलें.

## निर्गुण आणि निष्क्रिय पुरुष

सांख्यांच्या पुरुषाचें तिसरें वैशिष्ट्य म्हणजे पुरुष निर्गुण आहे हें होय. त्याच्या या निर्गुणत्वाचा राजपुरुषाशीं काय संबंध पोंचतो याचा बेडेकरांनीं कांहीं खुलासा केला नाहीं. व सकल-गुण-संपन्न राजपुरुषाची सांख्यांच्या निर्लेप पुरुषाशीं कशी सांगड घालावी याची मलाहि कांहीं कल्पना करतां येत नसल्यानें हा मुद्दा येथेंच सोडणें प्राप्त आहे.

सांख्यांच्या पुरुषाचा चौथा धर्म म्हणजे त्याची निष्क्रियता. पुरुष निष्क्रिय आहे याचें दार्शनिक कारण असें कीं तो जर क्रियावान् राहील तर त्याच्या ठिकाणीं क्षयातिशय (कमजास्तपणा) संभवेल व मग त्याच्या नित्यत्वास बाध येईल. चंचल व अस्थिर अशा विश्व-संसारांत माझ्या अस्मितेचा गाभा जें पुरुषतत्त्व तें तरी निश्चल, नित्य, अविनाशी ठरो ही सांख्यदर्शनाची, वैदिक वारशानें आलेली प्रेरणा. यांतूनच पुरुषाच्या निष्क्रियतेची केवळसाक्षीपणाची कल्पना निघाली हें सुसंगत आहे. हें सोडून पुरुषाची निष्क्रि-








यता म्हणजे राजपुरुषाचा ऐदीपणा आहे असें म्हणणें गैरलागू होय.

सांख्यांच्या पुरुषाचीं चारीं वैशिष्ट्यें क्रमानें घेऊन आपण पाहिलें कीं त्याचा आणि प्रजेच्या हिताविषयीं उदासीन असणारा तथाकथित निष्क्रिय व भोगस्वामी राजपुरुष यांचा अर्थाअर्थी कांहीं संबंध नाहीं. त्यानंतर सांख्यांची प्रकृति ही आपल्या स्थिर ग्रामव्यवस्थेची प्रतीक नाहीं हें थोडक्यांत दाखवून हा लेख आटोपता घेतों.

प्रकृतीचें अचेतनत्व व असहायपणें पिळली जाणारी रूढिग्रस्त ग्रामीण जनता यांच्यांत कांहीं साम्य नाहीं हें वर 'पुरुष'तत्त्वाचा विचार करतांना आपाततः सांगितलें गेलेंच. आतां उरली प्रकृतीची त्रिगुणात्मकता.

## प्रकृतीची त्रिगुणात्मकता

सांख्य म्हणतात सत्त्व, रजस् व तमस् अशा तीन गुणांची मिळून प्रकृति बनली आहे. बेडेकर म्हणतात कीं हे तीन गुण म्हणजे आणखी कोणी नसून कृषिप्रधान भारतीय ग्रामजीवनांतील महत्त्वाचे असे तीन घटक म्हणजे अनुक्रमें (१) आकाशांतून मिळणारें ऊन व पाऊस (सत्त्व), (२) शेतकऱ्याचे श्रम (रजस्), व (३) जमीन (तमस्) हे होत.

मी म्हणतों कीं बेडेकरांचें म्हणणें एका अंशानें खरेंहि आहे. पण तें अशा एका अंशानें खरें आहे कीं त्यांचा मुख्य सिद्धान्त खोटा ठरावा.

माझें हें म्हणणें समजण्यासाठीं प्रकृति म्हणजे काय हें परत एकवार सांगितलें पाहिजे.

वस्तुजाताकडे तात्त्विक दृष्टीनें पाहूं गेल्यास कुठल्याहि वस्तूचे दोन अवच्छेद (विभाग) डोळ्यासमोर येतात. एक म्हणजे त्या वस्तूंतील वस्तुतत्त्व, द्रव्य अथवा सब्स्टन्स व दुसरा म्हणजे त्या वस्तूचीं नामरूपें, गुण अथवा ॲट्रिब्यूट. माझ्या टेबलावर तोडून ठेवलेलें फूल ही वस्तु घेतल्यास तिच्यांतील वस्तुतत्त्व अथवा द्रव्य हें पांच मिनिटापूर्वी जें होतें तेंच – अगदी तेंच – आतांहि आहे असें आपण समजतों. असें मानलें नाहीं तर 'तेंच हें फूल' हें म्हणणें निरर्थ होईल. तेव्हां द्रव्यांशानें फूल ही वस्तु (सापेक्षतया) नित्य ठरली. पण पांच मिनिटापूर्वी टवटवीत असलेलें फूल आतां कोमेजलें. त्याचें 'रूप' बदललें (आपण त्यास 'निर्माल्य' म्हटलें तर त्याचें नामहि बदललें.) तेव्हां नामरूपें अथवा गुण हे सदा गतिमान्, बदलणारे आणि अस्थिर असतात. कुठल्याहि वस्तूचें नित्य राहणारें द्रव्य व अनित्य असणारे गुण असे दोन अंश असतात. हीच दृष्टि सांख्यांनीं साऱ्या विश्वाकडे पाहतांना लावली. नित्य अतएव द्रव्यस्वरूप (अधिष्ठानभूत) आत्मतत्त्व त्यांनीं एका बाजूस काढलें. (त्यांनीं आत्मे–पुरुष अनेक आहेत असें मानलें हा भाग वेगळा.) व दुसऱ्या बाजूस अस्थिर नामरूपांचा अथवा गुणांचा एक समुच्चय केला. तीच सांख्यांची प्रकृति.

पण केवळ या गुणांची एक गठडी वळून भागणार नव्हतें. सांख्यदर्शन हें तत्त्वज्ञान असल्यानें त्या गुणसमूहाची कांहीं व्यवस्था लावणें प्राप्त होतें. तशी व्यवस्था, सांख्यांनीं त्या सर्व गुणांची सात्त्विक, राजस, व तामस अशी विभागणी करून लाविली. हें वर्गीकरण किती व्यापक, संग्राहक व सर्वंकष होऊं शकतें हें गीतेच्या १७ व्या अध्यायाकडे दृष्टिक्षेप केल्यास सहज लक्षांत येतें. वर्गीकरणाचीं निरनिराळीं प्रयोजनें प्रस्तुत असतां सत्त्व, रजस् व तमस् यांचे विशेष अर्थ थोडे थोडे बदलतात : वस्तूंच्या केवळ भौतिक गुणांकडे पाहिल्यास सात्त्विक म्हणजे हलके [ वर चढणारे ], राजस म्हणजे गतिमान् व तामस म्हणजे जड [ खालीं बुडणारे ]. मानवी सुखदुःखांच्या अपेक्षेनें पदार्थांचें वर्गीकरण केल्यास सात्त्विक म्हणजे सुखकारी, राजस म्हणजे दुःख देणारे व तामस म्हणजे मूढ बनविणारे असे अर्थ निघतात. ही वर्गीकरणाची तऱ्हा अशी व्यापक असल्यानें त्यांतून बेडेकर म्हणतात तेहि अर्थ निघूं शकतील. कृषिव्यवसायाच्या दृष्टिकोनांतून विश्वघटकांचें वर्गीकरण करून सत्त्व म्हणजे आकाशांतून मिळणारे ऊनपाऊस, रजस् म्हणजे भूमि सुफलित करणारे शेतकऱ्याचे श्रम व तमस् म्हणजे धरणी असे कोणी अर्थ काढल्यास ते सांख्यदर्शनास मानवण्यासारखे आहेत. म्हणून मी वर म्हटलें कीं एका अंशानें बेडेकरांचें म्हणणें खरेंहि आहे.

पण या अंशानें बेडेकरांचें म्हणणें खरें आहे असें मानल्यानें प्रकृति म्हणजे आपल्या स्थिरस्वरूपाच्या ग्रामव्यवस्थेचें प्रतीक हा त्यांचा सिद्धान्त खोटा ठरतो. कारण त्यांचा वरील अर्थ काढण्यासाठीं प्रकृति म्हणजे

नामरूपांचा अथवा गुणांचा एकत्रित समुदाय असा सिद्धान्त करावा लागतो.

वरील विवेचनावर एक आक्षेप येणारच. तो असाः सांख्यदर्शनावरील साऱ्या टीकाकारांनीं ' गुण ' याचा अर्थ ' गुणधर्म ' असा घेऊं नये, ' घटक ' असा घ्यावा असें निक्षून सांगितलें आहे. त्याकडे खुशाल डोळेझांक करून मी ' गुण ' म्हणजे ' गुणधर्म ' — जसा फुलाचा वास — असा अर्थ घेऊन राहिलों आहे, व अर्थात् हें चूक होईल ! यावर माझें उत्तर असें : साऱ्या टीकाकारांनीं सत्त्व, रजस् व तमस् हे प्रकृतीचे गुणधर्म – नामरूपें – नव्हेत म्हणून बजावलें तें अशाकरतां कीं हे जर प्रकृतीचे गुण मानले तर याहून निराळी अशी जी प्रकृति ती कुठें राहिली, ती कशी आहे-असे प्रश्न निघतील. ते तर निघतां नयेत. म्हणून त्यांनीं सांगून ठेवलें कीं सत्त्व, रजस् व तमस् हे प्रकृतीचे घटक आहेत. त्याहून निराळी प्रकृति म्हणून कोणी नाहीं.

पण चिकित्सक दृष्टीनें पाहाणाऱ्यास ही आपत्ति येतच नाहीं. वस्तुजातांतील सारीं नामरूपें, सारे गुण एकत्र करून बनविलेलें रसायन म्हणजे प्रकृति ही भूमिका ध्यानांत ठेवल्यावर, गुण म्हणजे गुणधर्म असा अर्थ घेऊनहि, सत्त्व, रजस् व तमस् असे जिचे गुण आहेत ती, या गुणाहून निराळी अशी प्रकृति कुठें आहे असा प्रश्नच निघत नाहीं. अखंड गतिमान् गुणांचें समूहीकरण म्हणजेच प्रकृति. अर्थात् गुण हे प्रकृतीचे घटक आहेतच पण ते गुणधर्म नाहींत असें नाहीं.

प्रकृति म्हणजे नामरूपांचा, गुणांचा समुच्चय या माझ्या अर्थास ग्रंथांतरीं आधार आहे. 'सांख्यकारिकां' मध्यें १७ व्या कारिकेंत पुरुषाचें अस्तित्व सिद्ध करण्यासाठीं चारपांच कारणें दिलीं आहेत. त्यांत एक कारण ' त्रिगुणादिविपर्ययात् ' असें दिलें आहे. टीकाकारांना त्याचा अर्थ नीट लागत नाहीं व म्हणून निरनिराळ्या टीकाकारांनीं त्याचे निरनिराळे अर्थ बसविले आहेत. पण मी म्हणतों त्याप्रमाणें गुण याचा अर्थ नेहमींचाच ( कोशांतील ) म्हणजे गुणधर्म अथवा नामरूपें असा घेतल्यास ' त्रिगुणादिविपर्ययात् ' याचा अर्थ नीट लागतो. तो असाः " ज्याअर्थी सात्त्विक, राजस व तामस अशा तीन प्रकारचे गुणधर्म अथवा नामरूपें आहेत ( ' आदि 'शब्दानें या नामरूपांची अस्थिरता, चंचलता घेतां येईल ), त्या अर्थीं, त्यांची दुसरी बाजू म्हणून ( त्यांना आधारभूत म्हणून ) त्यांच्या अत्यंत विरुद्ध ( विपर्यय ) म्हणजे गुणविरहित, नित्य केवल द्रव्यस्वरूप असें कांहीं असलें पाहिजे. तेंच पुरुषतत्त्व होय. "

[ सांख्यांनीं प्रकृति एक मानली व पुरुष अनेक मानले याची उपपत्ति अशी : प्रकृति म्हणजे नामरूपें. ती अर्थात् जड, संवेदनाशून्य. त्यांना आपणांस एकमेकापासून विलग करून घेण्याचें सामर्थ्य नाहीं, त्यांना व्यक्तित्व नाहीं. याच्या उलट पुरुष चेतन आहे. त्यास जाणीव आहे. इतरांपासून स्वतःस विभक्त पहाण्याचा धर्म जाणिवेचाच आहे. हाच व्यक्तित्वाचा गाभा. पुरुष एकमेकांपासून विभक्त म्हणून अनेक आहेत. ]

सांख्यदर्शनांतील पुरुष व प्रकृति या कल्पना वर दाखविल्याप्रमाणें, एका विशिष्ट दृष्टिकोणांतून, सर्व विश्वाचा कांहीं अन्वय व व्यवस्था लावण्याच्या प्रयत्नांतून निघाल्या आहेत. भारतीय समाजव्यवस्थेशीं त्यांचा कांहीं संबंध नाहीं. केडेकर म्हणतात तो तर नाहींच नाहीं. सांख्यदर्शन एक स्वयंपूर्ण व स्वायत्त दर्शन आहे.

---

## गांधीजींची प्रेरणा

आज मी भूदानयज्ञाच्या कार्यास आरंभ केला आहे. पण ती ताकद माझी नाहीं. गांधीजींचीच प्रेरणा हें काम करीत आहे. त्यांनीं आपल्या शरीराचा त्याग करण्यापूर्वी आसक्तीचा त्याग केला होता. आज त्यांचें शरीर गळून पडल्यावर ते महान् आणि व्यापक बनले आहेत. आधुनिक शास्त्रांच्या रेडिओ वगैरे प्रयोगांमुळें आपणांस समजून चुकलें आहे कीं, आपला बोललेला शब्द नष्ट होत नाहीं; तो लहरींच्या रूपानें रहातो; त्याचें रेकार्ड घेतलें तर तो शब्द टिकूं शकतो. श्रीकृष्णाच्या काळीं जर रेकार्डिंग करण्याचा शोध लागला असता, तर आज गीता आपण श्रीकृष्णांच्या तोंडूनच ऐकूं शकलों असतों. शब्द हा नित्य आहेच. पण त्यापेक्षांहि विचार श्रेष्ठतर आहे. तो बहिऱ्यांच्याहि कानांत शिरतो. हवेप्रमाणें वातावरणांत पसरून रहातो.

— आचार्य विनोबा ' जीवनसाहित्य '

( ऑक्टोबर १९५४ मधून. )

डॉ. य. कृ. सोवनी

# राज्यपुनर्रचनेचा प्रश्न व महाराष्ट्र

भारतांतील राज्यांची पुनर्रचना करण्याचा प्रश्न किती निकडीचा आहे, याची जाणीव भारत-सरकारला व आमच्या पंतप्रधानांना दक्षिणेंत आंध्रामध्यें त्यासंबंधीं जो प्रक्षोभ झाला त्यामुळें विशेषतः झाली. लगेच आंध्रराज्यनिर्मितीच्या दिशेनें हालचाली सुरू झाल्या आणि १९५३ च्या ऑक्टोबरमध्यें नवें आंध्र-राज्य जन्मास आलें. पण केवळ एक आंध्र-राज्य निर्माण करून हा प्रश्न सुटणार नसल्यामुळें पंतप्रधान नेहरूंनीं आंध्रराज्य निर्माण करण्याची घोषणा केली त्यावेळींच दक्षिण भारतांतीलच नव्हे तर एकंदर भारतांतील राज्यघटकांची पुनर्रचना करणें जरूर आहे व त्यासाठीं लवकरच एक उच्चाधिकार-कमिशन भारत-सरकार नेमील असें जाहीर केलें होतें. विद्यमान राज्यरचनेंत ज्या प्रदेशांची कुचंबणा होत होती व स्वराज्य मिळूनहि त्याचे नैसर्गिक फायदे आपणांस मिळावे तसे मिळत नाहींत म्हणून ज्यांचा असंतोष वाढत चालला होता त्यांना एक प्रकारें या घोषणेमुळें दिलासा मिळाला होता आणि ते या उच्चाधिकार-कमिशनच्या नेमणुकीची आतुरतेनें वाट पहात होते. अखेर या उच्चाधिकार-कमिशनची नेमणूक १९५३ डिसेंबरच्या शेवटच्या आठवड्यांत प्रत्यक्ष करण्यांत येऊन त्यांनीं करावयाच्या चौकशीबद्दल एक छोटेंसें निवेदनहि पंतप्रधानांनीं लोकसभेंत केलें. श्री. फाजलअल्ली, श्री. पणिक्कर व पं. कुंझरू या तिघांची या कमिशनवर नेमणूक करण्यांत येऊन श्री. फाजलअल्लींकडे कमिशनचें अध्यक्षपद देण्यांत आलें. कमिशनचे चिटणीस व इतर सहायक नोकरवर्ग सरकारी अधिकारी वर्गांतून घेण्यांत आला. कमिशन नेमल्याची घोषणा जरी डिसेंबर १९५३ मध्यें झाली तरी कमिशनच्या प्रत्यक्ष कामाला सुरवात मात्र १९५४ फेब्रुवारीच्या उत्तरार्धापासून झाली. तीन सभासदांपैकीं अध्यक्ष श्री. फाजलअल्ली हे भारताच्या वरिष्ठ न्यायालयाचे माजी न्यायाधीश असून समतोल वृत्ति, शांत स्वभाव, कुशाग्रबुद्धि, कायदेपांडित्य व न्यायनिष्ठुरता या गुणांबद्दल त्यांची ख्याति असल्याचें बोललें जातें. तसेंच श्री. पणिक्कर हेहि प्रख्यात इतिहासज्ञ व राज्यशास्त्रधुरंधर असून भारताच्याच नव्हे तर जगांतील इतर देशांच्याहि इतिहास-संस्कृतींचा त्यांचा गाढ अभ्यास आहे. प्रत्यक्ष राज्यकारभाराच्या क्षेत्रांतहि ते अनुभवी आहेत. पंडित कुंझरू हे तर भारतांतील प्रख्यात तत्त्वज्ञराजकारणी असून भारताच्या सर्वांगीण उत्कर्षासाठीं आयुष्य वाहिलेले एक प्रमुख भारतसेवक आहेत. संकुचित दृष्टिकोण तसेंच कोणाचेंहि अयोग्य दडपण यांचा आपल्या विचारशक्तीवर कधींहि पगडा बसूं न देणारे असे एक थोर भारतीय पुढारी ते मानले जातात. भारताच्या सामुदायिक संसाराची नीट अंतर्व्यवस्था लावून, भारतीय राष्ट्रकुटुंबांतील निरनिराळे घटक परस्पर गुण्यागोविंदानें नांदून स्वतःचा व त्याबरोबरच एकंदर भारतीय राष्ट्रकुटुंबाचा उत्कर्ष घडवून आणतील अशी नवी राज्यव्यवस्था निर्माण करण्याची महत्त्वाची कामगिरी या माननीय सदस्यांवर असून एका अर्थानें ते भारताचे शिल्पकार ठरणार आहेत.

### कमिशननें करावयाच्या चौकशीचें स्वरूप

कमिशन नेमल्याचें पं. नेहरूंनीं जाहीर केलें त्या वेळींच या कमिशननें करावयाच्या चौकशीचें स्वरूप त्यांनीं निवेदन केलें. स्वातंत्र्यप्राप्तीनंतर विशेषतः भारतांतील देशी संस्थानें विलीन झाल्यानंतर भारतांतील घटक राज्यांची फेरव्यवस्था करण्याची जरूरी अधिक भासूं लागली. भाषिक तत्त्वावर प्रांतांची पुनर्रचना करण्यांत यावी ही मागणीहि भारतांत जोरानें होत असून कॉंग्रेस-संघटनेनें आपल्या व्यवहारांत ही भाषिक व्यवस्था पूर्वीपासूनच अमलांत आणली आहे. नवी व्यवस्था करतांना कोणत्याहि एका प्रांतापुरता विचार करून भागणार नाहीं. भारतांतील एकंदर घटक राज्यांच्या व्यवस्थेचाच पायाशुद्ध विचार करणें अवश्य झालें आहे. राज्यघटक निश्चित करतांना तेथील रहिवाशांची समान भाषा हें जरी एक गमक लक्षण बऱ्याच



अनुक्रमणिका






अर्थानें दिसत असलें तरी त्याबरोबरच इतर बाजूंचाहि विचार करणें अवश्य आहे. कोणतीहि नवी व्यवस्था आर्थिक दृष्ट्याहि समाधानकारक असणें तितकेंच जरूरीचें आहे. आणि ती भारताच्या विकास-कार्यक्रमास व पंचवार्षिक योजनांच्या उद्दिष्टांस अडथळा आणील अशीहि असतां कामा नये. तसेंच संकुचित दृष्टिकोणास अवसर मिळून भारताच्या सामर्थ्यास व सर्वांगीण उत्कर्षास कोणताहि धोका पोंचणार नाहीं इकडेहि लक्ष देणें अवश्य आहे. म्हणून ह्या प्रश्नाचा दूरदृष्टीनें व तत्त्वशुद्ध रीतीनें विचार करून निर्णय देणें अवश्य आहे. याप्रमाणें राज्यपुनर्रचना कमिशन नेमतांना त्या प्रश्नाची एकंदर पार्श्वभूमि पं. नेहरूंनीं आपल्या निवेदनांत थोडक्यांत दिग्दर्शित केली. कोणतेंहि कमिशन नेमण्यांत आलें म्हणजे त्याच्याकडे चौकशी करून निकाल देण्यासाठीं अगर शिफारसी करण्यासाठीं कांहीं विवक्षित मुद्दे अगर प्रश्न ( Terms of Reference ) स्पष्टपणें निर्देशिले जातात व त्या अनुरोधानें कमिशन आपलें कार्य करीत असतें. या कमिशनच्या बाबतींत मात्र असे कोणतेहि विशिष्ट रेखीव मुद्दे न देतां या प्रश्नासंबंधीं सर्वांगीण विचार व्हावा या उद्देशानें चौकशीचें स्वरूप बरेंच लवचिक, स्पष्ट मर्यादा नसणारें असें ठेवण्यांत आलें असावें. कारण पं. नेहरूंनीं लोकसभेंत केलेल्या निवेदनाखेरीज कोणताहि वेगळा खर्डा कमिशनकडे त्यांच्या कामकाजाचें स्वरूप व धोरण निश्चित करण्याच्या दृष्टीनें सुपूर्त केलेला नाहीं. ही पद्धति कितपत इष्ट आहे याबद्दल कदाचित् मतभेद असूं शकतील. कारण निर्णयाचे व चौकशीचे मुद्दे स्पष्ट व रेखीव नसल्यास चौकशी करणारांना बरेंच स्वातंत्र्य मिळतें व त्यामुळें त्यांचे निर्णयहि कदाचित् मुद्द्यास धरून न येतां गोलमोल स्वरूपाचे येण्याचा संभव असतो. पण आज त्याबद्दल कोणतेंहि निश्चित मतप्रदर्शन करणें कठीण आहे.

### अभिनव कार्यपद्धति

कमिशननेंहि आपल्या कार्याची स्वीकारलेली पद्धति एक प्रकारें अभिनवच म्हणावी लागेल. त्यांनीं आपल्या कामास सुरवात करतांना, सर्वसाधारणपणें कोणतेंहि कमिशन जशी एखादी प्रश्नावली काढते व ती जाहीर करून संबंधित संस्था व व्यक्ति यांचेकडून त्यावर उत्तरें मागवितें तशी कोणतीहि पद्धति स्वीकारली नाहीं. पंडित नेहरूंच्या लोकसभेंतील निवेदनाचा प्रमुख मुद्द्यांचा भाग घेऊन तोच कमिशननें लोकांसाठीं जाहीर केला व या प्रश्नांत लक्ष घालणाऱ्या किंवा त्याशीं हितसंबंध असणाऱ्या व्यक्तींनीं अगर संस्थांनीं त्या अनुरोधानें आपापलीं निवेदनें कमिशनला ता. २४ एप्रिल १९५४ पर्यंत सादर करावींत असें जाहीर केलें. या पद्धतीमुळें विशिष्ट प्रश्नांशीं लोकांचीं उत्तरें जखडून न राहतां त्यांनाहि या प्रश्नाची सांगोपांग चर्चा करून आपापली मागणी अनिर्बंधपणें व विस्तृत रीतीनें मांडण्यास अवसर मिळाला. त्याबरोबरच अनेक गैरलागू व अवास्तव मुद्देहि या निवेदनांत समाविष्ट करण्यास कांहींना संधि मिळाली. कमिशननें निवेदनें सादर करण्यासाठीं दिलेली मुदत सर्वांनाच अपुरी वाटल्यामुळें बहुतेकांनीं कमिशनकडे त्याबद्दल तक्रारी केल्या व ती वाढवून मिळण्याबद्दल विनंति केली. नंतर ३१ मे १९५४ पर्यंत निवेदनें सादर करावयाची मुदत वाढविण्यांत आली. आपल्या कार्यास लागणारी प्राथमिक माहिती कमिशन सुरवातीस दिल्ली येथेंच गोळा करील व सर्वांकडून निवेदनें आल्यावर मग प्रत्यक्ष चौकशीच्या अगर फेरतपासणीच्या कार्यासाठीं ते भारताच्या निरनिराळ्या भागांत दौरा करतील असें वाटत होतें. पण यापेक्षां वेगळी कार्यपद्धति त्यांनीं स्वीकारली. दिल्लींत लोकसभेच्या व राज्यसभेच्या सदस्यांच्या मुलाखती घेण्यास त्यांनीं सुरवात करून या प्रश्नाबाबतचीं त्यांचीं ते मतें अजमावूं लागले. अशा रीतीनें कांहीं मुलाखती घेतल्यानंतर निरनिराळ्या प्रदेशांतील दौऱ्यासहि त्यांनीं सुरवात केली. कोणा व्यक्तीस अगर संस्थेस भेटीस बोलवावयाचें याचें आधीं वेळापत्रक कांहींच न ठरवतां किंवा त्या त्या राज्यसरकाराकडे याबाबतची कोणतीहि व्यवस्था सुपूर्त न करतां कमिशन एकदम एखाद्या गांवीं जाई व तेथें ज्या व्यक्ती अगर संस्था कमिशनच्या चिटणिसाला त्याच्या दृष्टीनें अगर माहितीप्रमाणें महत्त्वाच्या वाटतील त्यांना भेटीसाठीं बोलावण्यांत येई. किंवा जे लोक आपणहून त्यांच्या दाराशीं थडकतील त्यांचीहि भेट, वेळ असल्यास घेण्यांत येई. कमिशनच्या या कार्यपद्धतीबद्दल लोकांना जरा विस्मय वाटला व त्याबद्दल कमिशनकडे तक्रार अगर चौकशी करतां असें सांगण्यांत आल्याचें कळतें कीं या प्रश्नाची प्रत्यक्ष

त्या त्या जागीं जाऊन थोडीफार ओळख करून घेणें अशा प्राथमिक स्वरूपाची ही पहिली चौकशी आहे. सर्वांकडून निवेदनें आल्यावर मग निवेदन पाठविणाऱ्या व्यक्तींना अगर संस्थांना अधिकृतपणें चौकशीसाठीं बोलावण्यांत येईल असें सांगण्यांत आलें. परंतु निवेदनें मिळाल्यानंतर पुनः कमिशनची चौकशीसाठीं दुसरी फेरी झाली. त्या वेळींहि पूर्वी स्वीकारलेल्या पद्धतींत फारसा फेरबदल केलेला आढळून आला नाहीं. कमिशनची एकंदर कार्यपद्धति लक्षांत घेऊन लोकांनीं आपणहूनच पुढें आपली बाजू कमिशनपुढें समक्ष मांडण्यासाठीं आधीं-पासून जागरूकता ठेवली व कमिशन बोलावो न बोलावो आपापलीं शिष्टमंडळें भेटीस नेण्याची त्यांनीं तयारी ठेवली. कमिशनची मुंबई राज्यांत पहिली फेरी एप्रिल-मध्याच्या सुमारास झाली व दुसरी व कदाचित् अखेरची फेरी ऑगस्टच्या चौथ्या आठवड्यांत झाली. महाविदर्भ व मराठवाडा यांमध्यें प्राथमिक फेरी झालीच नाहीं तर निवेदनें पोहोंचल्यानंतरच त्या भागांत त्यांनीं दौरा काढला. मराठवाड्यांतील चौकशी बहुतेक जुलैच्या पहिल्या आठवड्यांत झाली व महा-विदर्भांतील चौकशी ऑगस्टच्या दुसऱ्या व तिसऱ्या आठवड्यांत झाली. जूनच्या तिसऱ्या आठवड्यांत कर्नाटक भागांत कमिशन दौऱ्यावर होतें त्यावेळीं बेळगांव वगैरे महाराष्ट्राच्या सरहद्दीवरील भागांतहि जाऊन त्यांनीं तेथें चौकशी केली. संबंधित संस्था व व्यक्ति यांकडून निवेदनें पोंचल्यानंतर त्यांचा नीट अभ्यास करून त्यांतील मुद्द्यांचें टिपण करून — विशेषतः विवाद्य मुद्द्यांचें टिपण करून — त्या अनुरोधानें कमिशन त्या मुद्द्याबाबत फेरतपासांत विशेष छाननी करील अथवा खुलासा मागेल अशी अनेकांची समजूत होती. परंतु कमिशनच्या चौकशीचें स्वरूप तसें दिसलें नाहीं. अर्थात् विवाद्य मुद्द्यासंबंधीं प्रश्नोत्तरें होत. परंतु एकादें शिष्टमंडळ भेटीस जाण्यापूर्वी त्यानें आधीं निवेदनांत कोणते मुद्दे मांडले आहेत, त्यांतील कोणते इतर निवेदनांतील मुद्द्यांशीं विरोधी आहेत, कोणते अस्पष्ट आहेत अगर कोणते त्यांना असंमत होण्यासारखे आहेत याचें कसलेंहि टांचण कमिशनच्या सदस्यांपुढें नसें. कमिशनचे सभासद शिष्टमंडळांतील व्यक्ती पाहून त्यांना योग्य दिसतील ते प्रश्न करीत. प्रश्नोत्तरांची तपशीलवार नोंद कमिशन-च्या कर्मचाऱ्यांकडून होत असे. पण न्यायाधीश न्यायालयांत जशी स्वतः नोंद करीत असतो अगर त्याचेपुढील कागदपत्रांच्या आधारें तो आपलें काम चालवीत असतो तसें या चौकशीचें एकंदर स्वरूप दिसून आलें नाहीं. कमिशनच्या सभासदानें त्यास सुचतील अगर इष्ट दिसतील ते प्रश्न विचारावेत व त्यांस लोकांनीं उत्तरें द्यावींत. त्यामुळें पुष्कळ वेळां ज्या मुद्द्याबाबत लेखी निवेदनांत आधींच सविस्तर विवेचन केलेलें असें, असे प्रश्नहि विचारले जात व निवेदनांतील त्या भागाकडे कमिशनचें लक्ष्य वेधावें लागे. अर्थात् ही कार्यपद्धति असली तरी महत्त्वाचे अगर विवाद्य प्रश्न चर्चेतून सुटत नसत. या कमिशनच्या बाबतींत सर्वच कांहीं अभिनव. या संबंधांत जातां जातां या गोष्टींचा उल्लेख केला आहे एवढेंच. नहून त्यामुळें कमिशनच्या कार्यास मोठें गौणत्व आलें हें दाखविण्याचा उद्देश नाहीं.

## संयुक्तमहाराष्ट्रपरिषदेचें सर्वपक्षीय व्यासपीठ

उच्चाधिकार-कमिशन नेमलें जाण्याचें जाहीर झाल्यापासून महाराष्ट्र-राज्याच्या अगर संयुक्तमहाराष्ट्रा-च्या चळवळीनें पुनः जोरानें उचल खाल्ली. १९४८ सालीं नेमण्यांत आलेलें दार-कमिशन व त्यानंतर कॉंग्रेसनें नेमलेली जवाहर-वल्लभ-पट्टाभि-समिति या दोहोंच्या अहवालामुळें संयुक्तमहाराष्ट्रवाद्यांची तीव्र निराशा झाली होती. दार-कमिशनच्या अहवालामुळें विशेषतः त्यामध्यें महाराष्ट्राबद्दल केलेल्या कांहीं विधानांमुळें महाराष्ट्रांत तीव्र असंतोष निर्माण झाला होता. त्या रिपोर्टानें मूळ भाषावार प्रांतरचनेच्या तत्त्वावरच थोडाबहुत हल्ला चढविला होता. कॉंग्रेसनें हें तत्त्व तर गेलीं २५-३० वर्षे मान्य केलें होतें एवढेंच नव्हें तर आपल्या प्रत्यक्ष कार्यवाहींत आणलें होतें. दार-कमिशनच्या अहवालामुळें कॉंग्रेस-जनांत तीव्र असंतोष निर्माण झाला होता व तो थोडाफार शांत करण्याचें काम जवाहर-वल्लभ-पट्टाभि-समितीनें केलें. पण प्रत्यक्ष फलनिष्पत्तीच्या दृष्टीनें या त्रिमूर्तींच्या अहवालाचा दार-कमिशनच्या अहवालाहून वेगळा असा कोणताच परिणाम झाला नाहीं. उलट, दार-कमिशनच्या अहवालांतील कांहीं अनिष्ट गोष्टींचें शिक्कामोर्तब या अहवालानें झालें व सध्यां सुरू असले-ल्या कमिशनच्या चौकशींत या गोष्टी आतां पुराव्या-










दाखल म्हणून उद्धृत करण्यांत येत आहेत. या दोन समित्यांच्या अहवालानंतर महाराष्ट्रांतील संयुक्तमहाराष्ट्र-चळवळीचा जोर जरा कमी झाल्यासारखा दिसला तरी ती पूर्णपणें थंडावली नव्हती. अधिकारारूढ कॉंग्रेस-पक्ष या बाबतींत विशेष हालचाल करीत नव्हता तरी विरोधी पक्षांनीं मात्र संयुक्त महाराष्ट्राची चळवळ आपापल्या परीनें चालविली होती. आंध्रचा प्रश्न धसास लागला. पोट्टी राम्मलूनें बलिदान केलें व सबंध आंध्रदेश खवळून उठला व घातपाती कृत्यांनीं राज्ययंत्र हालवून सोडलें, अर्थात् या गंभीर परिस्थितीकडे डोळेझांक करणें शक्यच नव्हतें. पं. नेहरूंना आंध्र-निर्मितीची घोषणा त्वरित करावी लागली व त्या दृष्टीनें प्रत्यक्ष हालचाली सुरूं झाल्या आणि १९५३ च्या ऑक्टोबरमध्यें आंध्र राज्य उदयाचलीं आलें. या घटनेमुळें साहजिकपणेंच भाषावार प्रांताची मागणी करणाऱ्या इतर प्रदेशांनाहि स्फुरण चढलें. महाराष्ट्रांत थंडावलेली संयुक्तमहाराष्ट्रपरिषद् पुनरपि जागृत झाली. संयुक्त-महाराष्ट्रपरिषदेंत तिच्या स्थापनेपासून महाराष्ट्रांतील सर्व राजकीय पक्ष सामील झाले आहेत व पक्षभेदातीत असा हा प्रश्न संयुक्तमहाराष्ट्रपरिषदेच्या सर्वपक्षीय भूमिकेवरूनच हाताळणें इष्ट आहे असें सर्वांचें मत होतें व आजहि आहे. म्हणून या परिषदेच्या व्यासपीठावरूनच संयुक्त-महाराष्ट्र-निर्मितीच्या प्रयत्नास जोरानें चालना देणें अवश्य होतें. ऑक्टोबर १९५३ मध्यें सं म. परिषदेच्या प्रतिनिधिमंडळाची व कार्यकारी मंडळाची सभा भरून जुनें प्रतिनिधिमंडळ बरखास्त करून बदललेल्या परिस्थितीस अनुरूप असें नवें प्रतिनिधिमंडळ बनविण्याचा अधिकार कार्यकारी मंडळास देण्यांत आला व त्याप्रमाणें बनलेल्या नव्या प्रतिनिधिमंडळाची सभा डिसेंबरमध्यें होऊन नवें कार्यकारी मंडळ निवडण्यांत आलें व परिषदेच्या कार्यास जोरानें चालना मिळाली. तत्पूर्वी ३।४ महिने पश्चिम महाराष्ट्र, नागपूर, विदर्भ व मराठवाडा यांतील प्रमुख कॉंग्रेस पुढाऱ्यांनीं एकत्र येऊन संयुक्तमहाराष्ट्र-निर्मितीच्या मार्गांतील अंतर्गत अडचणी दूर करण्याच्या उद्देशानें नागपूर येथें १९५३ सप्टेंबर – अखेरीस जो एक करार केला त्यासहि मान्यता देण्यांत आली. बदललेल्या घटनात्मक परिस्थितींत पूर्वीच्या अकोला-करारांतील उद्दिष्टें साध्य होतील असेंच या नागपूर-करारांचें स्वरूप असल्यानें त्यास सर्वांनीं संमति दिली. संयुक्तमहाराष्ट्रपरिषदेनें मुंबई येथें आपलें कार्यालय उघडलें व तेथून सर्व हालचाली सुरूं झाल्या.

### अखिल मराठीभाषी प्रदेशाचें

### प्रातिनिधिक निवेदन

संयुक्तमहाराष्ट्रपरिषदेच्या कार्यकारी मंडळाची पुनः फेब्रुवारी १९५४ मध्यें बैठक होऊन परिषदेच्या घटनेंत जरूर ते फेरफार स्वीकृत करण्यांत आले. प्रचंड प्रमाणावर परिषदेचे सभासद करण्याचें ठरविलें. महाराष्ट्राच्या सर्व भागांत संयुक्तमहाराष्ट्राचा प्रचार व्हावा या उद्देशानें विभागसमित्याहि निर्माण करण्यांत आल्या. तसेंच या वेळीं उच्चाधिकार-कमिशनची प्रत्यक्ष नेमणूक झाली असल्यामुळें कमिशनला सादर करावयाचें निवेदन तयार करण्यासाठीं त्याच सभेंत एक निवेदन-समिति निवडण्यांत आली. प्रा. धनंजयराव गाडगीळांना त्या समितीचें अध्यक्षपद देण्यांत आलें व इतर ११ सभासदांत महाराष्ट्रांतील सर्व प्रमुख राजकीय पक्षांच्या प्रतिनिधींचा अंतर्भाव करण्यांत आला. महाराष्ट्रातर्फे एकमुखी मागणी व्हावी या दृष्टीनें निरनिराळ्या राजकीय पक्षांनीं आपापलीं वेगळीं निवेदनें सादर न करतां सर्वांनीं सं. म. परिषदेच्या निवेदनास पाठिंबा द्यावा असें ठरलें व बहुतेक सर्व राजकीय पक्षांच्या पुढाऱ्यांनीं तें मान्यहि केलें. एवढेंच नव्हे तर वैयक्तिक रीत्या कोणास कमिशनकडून बोलावणें आल्यास त्यांनींहि सं. म. परिषदेच्या निवेदनास धरूनच आपलें बोलणें करावें असें ठरलें. नागपूर-विदर्भ, मराठवाडा यांतील परिषदेचे प्रतिनिधीहि या सभांना उपस्थित असत. यामुळें यच्चयावत् मराठीभाषिक प्रदेशातर्फे अधिकृतपणें कमिशनपुढें आपली बाजू मांडण्याची जबाबदारी संयुक्तमहाराष्ट्रपरिषदेवर आली. फेब्रुवारी-अखेरीस कमिशननें एप्रिल २४ तारखेपर्यंत निवेदनें आपल्याकडे सादर करावींत असें जाहीर केलें. लगेच संयुक्तमहाराष्ट्रपरिषदेच्या निवेदन-समितीची मार्चच्या सुरवातीस सभा घेण्यांत येऊन निवेदनांत समाविष्ट करावयाच्या प्रमुख मुद्द्यासंबंधीं प्राथमिक चर्चा झाली. तसेंच दिलेली मुदत अपुरी असल्यामुळें आणखी महिना-दीडमहिन्यानीं ती वाढवून मागण्याचेंहि ठरविलें. त्यानंतर पुनः निवेदन-समितीची सभा ता. १४ मार्च रोजीं होऊन










५-६ तासाच्या चर्चेनंतर निवेदनाचा आराखडा निश्चित करण्यांत आला. पुढें निवेदनाचा हा आराखडा–निवेदनांत समाविष्ट करावयाच्या प्रमुख मुद्यांची जंत्री – (synopsis) निवेदनसमितीच्या तसेंच कार्यकारी मंडळाच्या सदस्याकडे पाठविण्यांत येऊन त्याबद्दल कोणास कांहीं तपशील सुचवावयाचा असल्यास अगर त्यांत कांहीं नवा मुद्दा समाविष्ट करणें जरूर असल्यास त्याप्रमाणें परिषदेच्या कार्यालयाकडे कळविण्याची विनंति करण्यांत आली. यानंतर कार्यालयाकडे आलेल्या निवेदनाबाबतच्या सर्व सूचना लक्षांत घेऊन निवेदनसमितीच्या अध्यक्षांनीं समितीच्या चिटणिसांच्या मदतीनें निवेदनाचा कच्चा खर्डा लिहून तयार केला व त्याच्या प्रती काढून निवेदनसमितीचे सदस्य व कार्यकारी मंडळाचे सदस्य यांच्याकडे त्या पाठविण्यांत आल्या. निवेदनाचा मसुदा प्रत्येकास अभ्यासण्यास पूर्ण अवसर देण्यांत येऊन त्यानंतर निवेदनसमितीची २ मे रोजीं सभा भरली. कार्यकारी मंडळाचे कांहीं सभासदहि त्यास हजर होते. सभेमध्यें निवेदनाच्या मसुद्याचें परिच्छेदवार परीक्षण होऊन सदस्यांकडून त्यामध्यें ज्या निरनिराळ्या दुरुस्त्या सुचविण्यांत आल्या त्यांसंबंधीं चर्चा होऊन सर्वांनुमतें योग्य ठरलेल्या स्वीकृत करण्यांत आल्या. या दुरुस्त्या स्वीकृत करून अखेरचा मसुदा ता. २५ मे रोजीं प्रथम निवेदनसमितीच्या सभेंत एकमतानें मंजूर करण्यांत आला व नंतर ता. २६ मे रोजीं कार्यकारी मंडळाच्या सभेंतहि त्यास एकमतानें शिक्कामोर्तब करण्यांत आलें. कार्यकारी मंडळानें सुचविलेले किरकोळ फेरफार स्वीकृत करून अखेर सर्वानुमतें मंजूर असें हें निवेदन कमिशनकडे ३१ मे रोजीं पाठविण्यांत आलें. निवेदनसमितीच्या व कार्यकारी मंडळाच्या या सभांत सर्व राजकीय पक्षीयांनीं अत्यंत आत्मीयतेनें व उत्साहानें भाग घेतला व अखिल महाराष्ट्राचें – मराठीभाषी प्रदेशाचें – प्रातिनिधिक लोकमत या निवेदनाच्या पाठीमागें आहे हें सिद्ध झालें. महाराष्ट्राच्या राजकीय इतिहासांत अशी अपूर्व राजकीय एकी फारच थोड्या वेळीं दृष्टोत्पत्तीस येते. आणि महाराष्ट्राच्या राजकीय जीवनांतील असे कांहीं प्रसंग पाहून महाराष्ट्राच्या उज्वल भवितव्याबद्दलच्या उत्कट आशावादानें मन अगदीं भारून जातें. असे प्रसंग सतत यावेत व नाना पक्षभेदांनीं ग्रासलेल्या भारतास एकतेच्या दिशेनें मार्गदर्शन करून भारताचें शिर जगांत उंच करण्याची महत्त्वाची कामगिरी आपला हा महाराष्ट्र करूं शकेल असा विश्वास, अशी आशा आपण कां बाळगूं नये ? महाराष्ट्रांतील अधिकारारूढ कॉंग्रेस-पक्षानेंहि आपल्या अनेक अडचणींचें निराकरण करून घेतलें व अखेर महाराष्ट्र-कॉंग्रेसनें संयुक्त-महाराष्ट्र-परिषदेच्या निवेदनासच आपला पाठिंबा दिला. वऱ्हाड-प्रदेश-कॉंग्रेस-कमिटीनें तसेंच मराठवाड्यांतील कॉंग्रेस-समित्यांनींहि याच निवेदनास पाठिंबा दिला इतर सर्व राजकीय पक्षांनींहि तसेंच केलें व कोणीहि आपलीं वेगळीं निवेदनें पाठविलीं नाहींत. महाराष्ट्राच्या निरनिराळ्या भागांत म्हणजे नाग-विदर्भ व मराठवाडा यांत प्रदेशपरत्वें कांहीं विशेष तपशीलाच्या गोष्टी मांडणें जरूर असल्यानें त्यांनीं परिषदेच्या मुख्य निवेदनास पाठिंबा देऊन आपलीं पुरवणी-निवेदनें सादर केलीं. सरहद्दीवरील विभाग-समित्यांनींहि हेंच धोरण स्वीकारलें. महाराष्ट्रांतील इतर कांहीं संस्थांनीं व व्यक्तींनीं स्वतंत्र निवेदनें पाठविलीं. पण त्यांची संख्या २-३ पेक्षां अधिक नाहीं. या सर्वांनींहि आपल्या निवेदनांत संयुक्तमहाराष्ट्रपरिषदेच्या निवेदनास पाठिंबाच व्यक्त केलेला आहे. फक्त नाग–विदर्भांत मात्र संयुक्त-महाराष्ट्राच्या एकाच राज्याची मागणी मान्य नसणारे व महाविदर्भाचा स्वतंत्र प्रांत करूं इच्छिणारे अशांचीं कांहीं स्वतंत्र निवेदनें गेलीं. मराठवाड्यांत मात्र संयुक्त-महाराष्ट्राच्या निवेदनास संपूर्ण पाठिंबा मिळून महाविदर्भास पाठिंबा देणारें एकहि निवेदन तेथून गेलें नाहीं.

संयुक्तमहाराष्ट्रपरिषदेनें सादर केलेलें हें निवेदन बरेंच विस्तृत असून त्याचे दोन भाग आहेत. हें संपूर्ण निवेदन इंग्रजींत व मराठींत आतां पुस्तकरूपानें वेगवेगळें प्रसिद्ध झालें असून ज्यांना हें मूळ निवेदन सविस्तर वाचण्याची इच्छा असेल त्यांना तें कोठेंहि विकत मिळूं शकतें. निवेदनाचा एकंदर विस्तार डेमी आकाराचीं १०० हून अधिक पानें असून त्यास आणखी महाराष्ट्राच्या लोकसंख्येची माहिती देणारीं व इतर परिशिष्टेंहि जोडलीं आहेत. एवढ्या विस्तृत निवेदनाचा त्रोटक सारांश देखील येथें देणें कितपत शक्य आहे हा प्रश्नच आहे. तरीपण निवेदनांतील










प्रमुख मुद्द्यांची थोडीफार ओळख करून देण्याचा प्रयत्न करीत आहे.

निवेदनाच्या पहिल्या भागांत राज्यपुनर्रचनेच्या मूलभूत तत्त्वांची चर्चा केली असून राज्यपुनर्रचना करतांना भाषा हेंच मुख्य आधारभूत तत्त्व कसें होऊं शकतें तें विस्तारानें व समर्पक रीतीनें विशद केलें आहे. राज्यपुनर्रचनेशीं संबद्ध अशा इतर आर्थिक वगैरे प्रश्नांचाहि ऊहापोह करण्यांत आला असून राज्यपुनर्रचनेनंतर भारताचा एकंदर नकाशा कसा होईल त्याचें चित्र रेखाटलें आहे. निवेदनाचा दुसरा भाग मुख्यतः महाराष्ट्राबद्दल असून त्यांत महाराष्ट्राचें क्षेत्र, लोकसंख्या, भौगोलिक रचना, नैसर्गिक संपत्ति, सरकारचें आर्थिक सामर्थ्य यांसंबंधीं तपशीलवार व आंकडेवार माहिती देण्यांत आली आहे. त्यानंतर मुंबई शहराचा प्रश्न विस्तारानें चर्चिला असून अखेरीस महाविदर्भाच्या स्वतंत्र राज्याच्या मागणीचा प्रश्न, हैद्राबादचें विभाजन व मराठवाड्याचा प्रश्न व कारवार आणि कोंकणी भाषिकांचा प्रश्न यांची चर्चा केली आहे.

## संघराज्याचे एकभाषिक एकात्म घटक

भारतांतील राज्यपुनर्रचनेसंबंधींच्या एकंदर प्रश्नाबाबत निवेदनाच्या पहिल्या भागांत चर्चा करतांना, सुरवातीस संघराज्यात्मक लोकशाहींतील राज्य अगर प्रांत सामाजिक व सांस्कृतिक दृष्ट्या एकात्म असणें कसें जरूरीचें आहे तें सांगून, ही सामाजिक व सांस्कृतिक एकात्मता भारतांत एकभाषिक प्रदेशांत कशी आढळून येते हें दाखवून भारताच्या संघराज्यांतील घटक राज्यांची उभारणी या भाषिक तत्त्वावरच पायाशुद्ध रीतीनें होऊं शकते हें दाखविलें आहे. स्वातंत्र्यपूर्व कालांतहि ब्रिटिश राज्यकर्त्यांनींहि हें तत्त्व कसें मान्य केलें होतें तें दाखवून भारताच्या राष्ट्रधुरीणांनींहि या तत्त्वास वेळोवेळीं कशी मान्यता दिली आहे तें सांगितलें आहे. इतिहासाचा ओघच भाषावार प्रांतरचना होण्याकडे आहे हेंहि त्यांत विशद केलें आहे. देशी संस्थानांचे प्रदेश विलीन करतांना हें भाषावारीचें तत्त्व स्वातंत्र्योत्तर कालांत देखील अवलंबिलें होतें. सामाजिक लोकशाहीचें उद्दिष्ट गांठण्यासाठीं भाषावार राज्यांची आवश्यकता आहे. एकभाषिक प्रदेशांत समान सांस्कृतिक व साहित्यिक परंपरा आढळून येतात, निरनिराळ्या जाती व धर्म असले तरी त्या सर्वांस भेदून जाणारी अशी एक प्रादेशिक संस्कृति असते व ही प्रादेशिक संस्कृति विशिष्ट एकभाषिक प्रदेशाशीं निगडित असते. सर्व भारताची ढोबळ रीतीनें एक संस्कृति असली तरी त्यामध्यें प्रदेशपरत्वें बरीच भिन्नता आहे. सर्व भारतामध्यें लोकशाहीव्यवहारक्षम असा एकच एकजिनसी लोकसमाज निर्माण करणें सत्यसृष्टीपलीकडील गोष्ट आहे. म्हणून प्रादेशिक विविधतेची जोपासना करूनच व्यापक दृष्टीनें भारताची सांस्कृतिक व सामाजिक एकता राखणें शक्य आहे. भारतांतील प्रादेशिक विविधता अखिलभारतीय एकत्वाच्या जाणीवेशीं बिलकूल विरोधी नाहीं. बहुभाषिक राज्यांचा कारभार किती बिकट होतो हें अनुभवानें सिद्ध झालें आहे. कोणत्याहि इतर स्वरूपाच्या तंट्यांना बहुभाषिक राज्यांत भाषिक तंट्याचें स्वरूप चटकन् येतें. त्यामुळें विकासयोजनांच्या मार्गांत अनेक अडचणी निर्माण होतात. पण केवळ हे तंटे-बखेडे टाळण्यासाठीं भाषिक राज्यांची मागणी नसून लोकशाही समाजजीवनाची पायाशुद्ध उभारणी करण्यासाठीं त्यांची मुख्यतः गरज आहे. ही मागणी विद्यमान राज्यघटनेच्या चौकटींत बसेल अशीच आहे. भारतांतील पुनर्घटित राज्यांच्या आर्थिक निर्वाहक्षमतेचा प्रश्न पुढें निवेदनांत विस्तारानें चर्चिला आहे. नवराज्यनिर्मितीसाठीं त्या राज्यांची आर्थिक निर्वाहक्षमता ही कांहीं आवश्यक बाब ठरत नाहीं. भारताच्या निरनिराळ्या राज्यांत दरडोई सरकारी उत्पन्नांत कितीतरी तफावत आहे. दरडोई कमी उत्पन्न असणारीं राज्येंहि आज निर्वाहक्षम आहेत. आर्थिक निर्वाहक्षमतेची कल्पना राहणीच्या अगर जीवनमानाच्या कल्पनेप्रमाणें सापेक्ष आहे. पुनर्रचनेनंतर नवीं बनणारीं राज्यें आयव्ययसामर्थ्याच्या दृष्टीनें विद्यमान राज्यांपेक्षां कोणत्याहि दृष्टीनें कमी ठरणार नाहींत. राज्यकारभाराच्या सोयी-गैरसोयीच्या मुद्द्याला मर्यादित महत्त्व आहे. राज्याचें आकारमान केवढें असावें हें ठरविण्याबाबत फारतर त्याचा संबंध येईल. पण हे सर्व इतर मुद्दे गौण होत. एकत्वाची भावना असलेला व समान सांस्कृतिक व सामाजिक परंपरा असणारा लोकसमाज हाच भारताच्या संघराज्यांतील घटक राज्यांच्या उभारणीचा खराखुरा योग्य असा पाया आहे.—नंतर भाषेनुसार भारतांतील पुनर्घटित राज्यांची संख्या व नांवें



अनुक्रमणिका






दिलीं असून राज्यघटनेंत निर्दिष्ट केलेल्या प्रमुख अशा सर्व भाषांचीं हीं राज्यें होतात हें दाखविलें आहे. विद्यमान राज्यांपैकीं बहुतेक राज्यें एकभाषिक असून कांहींच्या सरहद्दींत थोडा फेरबदल करून तीं एक-भाषिक होण्यासारखीं आहेत. फक्त हैद्राबाद, मध्यप्रदेश व मुंबई ही राज्येंच तेवढीं बहुभाषिक आहेत. आणि त्यांतूनहि फक्त मराठीलाच तेवढें स्वतःचें असें आज राज्य नाहीं. इतर सर्व भाषांना आज स्वतःचीं राज्यें आहेत. पुनर्घटित राज्यांची संख्या त्यांच्या विद्यमान संख्येपेक्षां न वाढतां कमीच होइल. एकूण १६ ते २० राज्यें होतील. अ, ब, क वगैरे राज्यांच्या दर्जामधील भेद आतां नाहींसे करून टाकणें अवश्य आहे. कांहीं ऐतिहासिक कारणामुळें त्यांची पूर्वी जरूरी भासली तरी आतां ते पुढें चालू ठेवण्याची बिलकूल गरज नाहीं. राजप्रमुखपदहि नष्ट करणें जरूर आहे. लहान राज्यें बनविण्यांत येऊं नयेत. विकासयोजनांच्या दृष्टीनें तीं गैरसोयीचीं व नुकसानीचीं होतात. त्यानंतर राज्यांच्या सीमा निश्चित करण्याचीं तत्त्वें सांगितलीं आहेत. खेडेगांव हा मूळ घटक धरून सीमा ठरविण्यांत याव्यात. तसेंच सीमा ही खंडित न होतां सरळ जाणारी असावी. सीमानिश्चितीचें काम सरहद्द-कमिशनसारख्या एकाद्या अधिकारी संस्थेवरच अखेर सोपवावें लागेल. निवेदनांत शेवटीं राज्यपुनर्रचनेमुळें निर्माण होणाऱ्या कांहीं प्रश्नांची चर्चा केली असून भाषिक अल्पसंख्या-कांचा प्रश्न समाधानकारक रीतीनें कसा सुटूं शकेल तें दाखविलें आहे.

## मराठीभाषी प्रदेशाचें एकात्मत्व

निवेदनाच्या दुसऱ्या विभागांत महाराष्ट्राची – सर्व मराठीभाषी प्रदेशाची – व समाजाचीहि एकजीवता कशी आहे तें दाखवून नंतर या प्रदेशाच्या नैसर्गिक क्षेत्रविस्ताराचें वर्णन व त्याचें भूगोलावरील स्थान दाखविलें आहे. महाराष्ट्रांतील प्रमुख नद्या व त्यांचीं बनलेलीं निरनिराळीं खोरीं, महाराष्ट्रदेश भौगोलिक दृष्ट्याहि कसा एकजीव आहे तें दाखवितात. नंतर महाराष्ट्रांत समाविष्ट होणारे सध्यांचे मुंबई, मध्यप्रदेश व हैद्राबाद राज्य यांतील मराठी जिल्हे देऊन त्यांचें एकूण क्षेत्र व लोकसंख्याहि देण्यांत आलीं आहेत. लोकसंख्येंतील मराठी भाषिकांचें प्रमाणहि दाखविलें आहे. महाराष्ट्रांत समाविष्ट होणाऱ्या सरहद्दीवरील तालुक्यांच्या क्षेत्रफळाचा व लोकसंख्येचाहि त्यांत हिशेब धरला आहे. अशा रीतीनें एकंदर महाराष्ट्राचें क्षेत्रफळ सुमारें १२७ हजार चौ. मैल होत असून लोकसंख्या ३ कोट ३७ लक्ष ८९ हजार होते. यामध्यें मराठीभाषिकांचें प्रमाण शेंकडा ७७ पडतें. नंतर महाराष्ट्राच्या नैसर्गिक साधनसंपत्तीची माहिती देऊन भावी महाराष्ट्रराज्याचें सरकारी उत्पन्न किती होऊं शकेल त्याचे आंकडे दिले आहेत. मुंबईतील मराठी जिल्हे, मध्यप्रदेशाचे मराठी जिल्हे व मराठवाडा यांचें वेगवेगळें उत्पन्न व खर्च देऊन अखेर सर्वांचें एकत्रित उत्पन्न दाखविलें आहे. तें १९५१–५२ सालामध्यें ५७ कोटी असल्याचें दिसून येतें. तसेंच महाराष्ट्राचें दरडोई सरकारी उत्पन्नहि दिलें असून तें सर्व महाराष्ट्रांत इ. १९५१–५२ मध्यें दर-डोई १७ रु. पडतें. या प्रत्यक्ष माहितीच्या आधारें महाराष्ट्रराज्य आर्थिक दृष्ट्या निर्वाहक्षम कसें आहे तेंहि दाखविलें आहे.

## मुंबईचा प्रश्न

नंतर मुंबई शहराच्या प्रश्नासंबंधानें सविस्तर चर्चा केली आहे. इतिहासकालापासून मुंबई शहर उत्तर कोंकणांत मोडतें व तेथें पूर्वापार राहणाऱ्या जमाती मराठीभाषिक असल्याचेंच सिद्ध होतें. १९ व्या शतकांतील युरोपियन इतिहासकारांनीं हीच गोष्ट मान्य केली आहे. आजहि मुंबई मराठीभाषिक प्रदेशांनीं परिवेष्टित असून दुसऱ्या भाषेची सरहद्द मुंबईपासून कमींत कमी ८० मैलावर आहे. याबाबतींत मुंबईची कलकत्ता व मद्रास शहरांशीं तुलना करण्यांत आली आहे. शहर केंद्रबिंदु धरून त्यापासून ७५ व २५० मैलांच्या त्रिज्येंत येणारे प्रदेश दाखविणारे मुंबई, कलकत्ता व मद्रास यांचे तीन नकाशे देण्यांत आले आहेत. मुंबई मराठीभाषिकांच्या जीवनाचें व कार्याचें केंद्र आहे. मराठीभाषिक नागर लोकसंख्या सर्वांत मुंबईंत केंद्रित झाली आहे. महाराष्ट्राच्या सांस्कृतिक व सामाजिक जीवनाचेंहि केंद्र मुंबई आहे. महाराष्ट्राच्या आर्थिक जीवनाचेंहि तें केंद्र आहे. मुंबईतील दुसऱ्या कोणत्याहि भाषिकांचें याप्रमाणें तें केंद्र नाहीं. मुंबई शहर महाराष्ट्राच्या भूप्रदेशाचा एक अविभाज्य भाग असल्यानें तें वेगळें काढून त्याचें स्वतंत्र राज्य करण्याची मागणी कोणत्याहि तत्त्वावर आधार-



अनुक्रमणिका








लेली नाहीं. मुंबईचा विकास घडवून आणण्यांत मराठेतर जमातींचा मोठा भाग आहे म्हणून ती वेगळी काढली पाहिजे असें सांगितलें जातें. ही विचारसरणी घातुक आहे. ही मागणी करणारांत मुख्यतः गुजराती भांडवलदार प्रमुख आहेत. तसें पाहिलें तर हा विकास इंग्रजांनीं घडवून आणला आहे. पण तेवढ्यासाठीं त्यांची राजकीय सत्ता रहावी असें कोणीच म्हणत नाहीं. आग्नेय आशियांतील अनेक देशांचा व शहरांचा विकास युरोपीय राष्ट्रांनीं घडवून आणला आहे; पण त्यांची तेथें राजकीय सत्ता रहावी असें आज कोणीहि मान्य करणार नाहीं. मुंबईत मराठीतर भाषिकांची संख्या मराठीपेक्षां जास्त आहे म्हणून तें वेगळें काढावें असें कांहीं म्हणतात – पण हें तत्त्व मान्य केल्यास प्रादेशिक एकतेच्या तत्त्वास बाध येतो. प्रदेशांतर्गत अशा एकाद्या विवक्षित जागीं अन्य भाषिकांची बहुसंख्या असल्यास तें ठिकाण त्या प्रदेशापासून वेगळें काढतां येत नाहीं. अखिल भारताच्या व्यापाराचें व उद्योगधंद्याचें केंद्र म्हणून मुंबईशहर वेगळें काढण्याचें ठरविल्यास इतर शहरांनाहि तोच नियम लावावा लागेल. महत्त्वाचे असे सर्व व्यापारी हितसंबंध संघराज्यसत्तेच्या अधिकारकक्षेंतच येतात. मुंबई महाराष्ट्रांत गेल्यानें त्यांना कोणताहि धोका पोंचत नाहीं. स्वतंत्र शहर ही कल्पना कालविपरीत व मध्ययुगीन आहे. मुंबई केंद्रशासित घटक होण्यानें संघराज्याच्या पायावरच आघात होणार आहे. महत्त्वाचे सर्व विषय संघराज्याच्या अधिकारकक्षेंतच आहेत. केंद्रशासित घटक बनण्यानें तेथील रहिवाश्यांना स्वराज्याच्या कारभारांत भाग घेतां येत नाहीं. भोंवतालच्या प्रदेशापासूनहि त्याचा संबंध तुटतो. शहर हें लगतच्या प्रदेशापासून तोडणें घातुक आहे. या प्रश्नाचा निर्णय देण्यासाठीं सार्वमताची मागणी करतां येत नाहीं. घटनेंत त्याची तरतूद नाहीं. महाराष्ट्र व मुंबई यांमध्यें व्यापारी जमाती मराठीतर भाषिकच आहेच. महाराष्ट्रांत प्रादेशिक अशा मोठ्या व्यापारी जमाती नाहींतच. अन्यभाषिक व्यापाऱ्यांचे हितसंबंध महाराष्ट्रांत सुरक्षित आहेत तसेंच मुंबईतहि ते राहतील. एका राज्यामध्यें निरनिराळ्या भाषिकांच्या दर्ज्यांत फरक करतां येत नाहीं. सर्वांना सारखेच राजकीय हक्क असतात. भाषिक अल्पसंख्याकांचे प्रश्न त्यांच्या शिक्षणासाठीं व सांस्कृतिक जोपासनेसाठीं विशेष तरतुदी करून सोडवितां येतात. व्यापारी व आर्थिक हितसंबंध मुंबईत सर्व सुरक्षित राहतील. स्थानिक कारभाराबाबत जादा अधिकार व सत्ता देण्यांत येऊन मुंबई शहर व उपनगरें यांच्यासाठीं बृहन्मुंबई–प्रदेशाच्या स्थानिक सत्तेकडे हे विस्तृत अधिकार देण्यास कांहींच हरकत नाहीं.

### कोंकणी व मराठी

यानंतर निवेदनांत कोंकणी व मराठी यांच्या संबंधाचा प्रश्न चर्चिला आहे. पोर्तुगीजांच्या भाषाविषयक धोरणामुळें कोंकणीचा नैसर्गिक विकास न होतां तो भलत्या दिशेनें झाला. त्यामुळें आज हा प्रश्न निर्माण होत आहे. भाषाशास्त्रज्ञांनीं कोंकणी ही मराठीला जवळची आहे, तिची बोली आहे, ती वेगळी भाषा नाहीं असें म्हटलें आहे. अलीकडील सरकारचे निर्णयहि असेच आहेत. कारवारकडील कोंकणीभाषिकांची आपण महाराष्ट्राचे घटक आहोंत हीच भावना आहे. त्यांचें समाजजीवन, चालीरीती वगैरे सर्व दृष्टींनीं ते महाराष्ट्राचे व मराठी समाजाचेच घटक आहेत.

### महाविदर्भाचा प्रश्न

नंतर महाविदर्भाच्या प्रश्नाची चर्चा केली असून सर्व मराठीभाषिक प्रदेशांचें ऐक्य कसें आहे, समाज, लोकजीवन, चालीरीती, जातिव्यवस्था या सर्व दृष्टींनीं पूर्व व पश्चिम महाराष्ट्र कसा एक आहे, शेती-उत्पादनांतहि कसें साम्य आहे तें दाखविलें आहे. महाविदर्भाचे जिल्हे पश्चिम महाराष्ट्रापेक्षां आर्थिक दृष्ट्याहि विशेष संपन्न असे नाहींत. या आठ जिल्ह्यांचें वेगळें राज्य करावें ही मागणी कृत्रिम आहे. अनेक वर्षें भिन्न शासनव्यवस्थेखालीं हे भाग राहिल्यानें जे परिणाम झाले आहेत व त्यामुळें नागपूरसारख्या शहरांना, जें महत्त्व आलें आहे तें लक्षांत घेऊन पूर्वी अकोला व आतां त्याच धर्तीवर घटनेंत बसेल अशा रीतीनें नागपूर-करार करण्यांत आला आहे. त्यामुळें लोकांच्या गैरसोयीचें निवारण होत आहे. संयुक्तमहाराष्ट्राची चळवळ सुरू होण्यापूर्वी तिकडे महाविदर्भाच्या चळवळीनें मूळ धरलें होतें. परंतु आतां सर्व मराठी भाषिकांचें राज्य दृष्टिपथांत व शक्यतेच्या कोटींत आल्यामुळें महाविदर्भाची मागणी करणें योग्य नाहीं व फायद्याचेंहि नाहीं.







## हैदराबादचें विभाजन आवश्यक

हैदराबादचें विभाजन ही दक्षिणेंतील भाषिक राज्यांचा प्रश्न सोडविण्याची गुरुकिल्ली असून तें घडून आल्यानें आंध्र, महाराष्ट्र व कर्नाटक या राज्यनिर्मितीचा प्रश्न सुकर होणार आहे. मराठी, कानडी व तेलगू भाषिकांचे प्रदेश शेजारच्या त्या त्या भाषिक प्रदेशांत समाविष्ट करण्यांत यावेत. हैद्राबादचें विभाजन भाषिक राज्यनिर्मितीच्या दृष्टीनेंच आवश्यक आहे असें नसून त्या राज्याच्या दुःखद स्मृती व दुष्ट भूतकाल गाडून टाकण्याच्या दृष्टीनेंहि तें अवश्य आहे. हैद्राबाद राज्याबाबत ती एक 'स्थैर्य निर्माण करणारी शक्ति', 'ऐक्यवर्धक दख्खनी संस्कृति' या कल्पना अत्यंत खोट्या असून वस्तुस्थिति यांहून अगदीं वेगळी आहे. निवेदनांत या 'दख्खनी संस्कृती'च्या कल्पनेचें यथार्थ स्वरूप विशद केलें असून या प्रतिगामी कल्पना गाडून टाकण्यासाठीं हैद्राबादचें विभाजन करणें अत्यंत जरूरीचें आहे हें सांगितलें आहे. मराठवाडा महाराष्ट्राचा एकजीव भाग असून अनेक मराठी साधुसंत व कवी मराठवाड्यांत निर्माण झाले आहेत. महाराष्ट्रांतील व मराठवाड्यांतील लोकांत सांस्कृतिक व सामाजिक ऐक्याची जाणीव असून मराठवाड्यांतील सर्व लोकप्रतिनिधींचा मराठवाड्याचें महाराष्ट्रांत विलीनीकरण करण्यास पूर्ण पाठिंबा आहे.

निवेदनांतील मुद्द्यांचा गोषवारा थोडक्यांत वरील प्रमाणें असून शेवटीं समारोप करतांना राज्यपुनर्रचनेबाबत कोणतेंतरी एक तत्त्व व कार्यपद्धति स्वीकारण्यांत यावी असें सुचवून, भाषिक राज्यांचें तत्त्व मान्य न झाल्यास व बहुभाषिक राज्यांत विशेष गुण आढळल्यास सर्व विद्यमान एकभाषिक राज्यांची पुनर्रचना करून तीं बहुभाषिक बनविण्यांत यावींत; आणि हें मान्य नसल्यास व भाषिक तत्त्व संमत असल्यास उरलेल्या बहुभाषिक राज्यांची पुनर्रचना करून तीं एकभाषिक करण्यांत यावींत असें सुचविलें आहे. कोणती तरी एक दिशा पत्करणें अवश्य आहे. तसेंच शहराचें वेगळें राज्य करण्याचें ठरल्यास तें तत्त्व मुंबईबाबत लागू न करतां भारतांतील त्यासारख्या इतर मोठ्या शहरांनाहि लागू करणें अवश्य आहे. तसेंच एकभाषिक प्रदेशाचें एक राज्य आकारमानानें व कारभाराच्या दृष्टीनें अवाढव्य होत नसल्यास त्याचीं दोन राज्यें केंव्हांहि श्रेयस्कर नाहींत, असेंहि सुचविण्यांत आलें आहे.

## लोकमत अजमावण्याचा प्रश्न

संयुक्तमहाराष्ट्राबाबत दोन मुख्य विवाद्य मुद्दे म्हणजे एक महाविदर्भाच्या स्वतंत्र राज्याच्या मागणीचा व दुसरा मुंबई शहराचें स्वतंत्र राज्य करण्याचा. मराठवाड्यांतील जनतेंत व पुढाऱ्यांत मात्र मराठवाडा महाराष्ट्रांत विलीन करण्याबाबत व सर्व मराठीभाषिक प्रदेशांचें एकच राज्य करण्याबाबत दुमत दिसून आलें नाहीं. कमिशनसमोर साक्षीस गेलेल्या अनेक संस्थांनीं व व्यक्तींनीं या मागणीसच पाठिंबा दिला आहे. सुरवातीस कमिशनचे सदस्य 'महाविदर्भास तुमचा पाठिंबा आहे काय व त्यांत समाविष्ट होण्यास तुमची तयारी आहे काय?' असा प्रश्न विचारीत. परंतु सर्वांचीं नकारार्थी उत्तरें येऊं लागल्यानें पुढें त्यांनीं हा प्रश्न विचारण्याचेंहि सोडून दिलें. मराठवाड्यांतील लोकमत कोणीकडे आहे हें त्यांना स्पष्टपणें कळून चुकलें. महाविदर्भांत मात्र संयुक्तमहाराष्ट्राचें एकच राज्य व्हावें म्हणणारे व महाविदर्भाचें वेगळें राज्य व्हावें म्हणणारे दोन तुल्यबल विचारप्रवाह आहेत असें त्यांच्या निदर्शनास आलें. म्हणून या प्रश्नाची सोडवणूक कशी होऊं शकेल याबद्दल कमिशननें संयुक्त महाराष्ट्र-परिषदेच्या शिष्टमंडळाशीं बरीच चर्चा केली. अकोला-करारावर पूर्वी एकमत झालें होतें. अकोला-करार घटनेंत बसत नाहीं म्हणून नागपूर-करार केला. पण अकोला-करारांतील उपप्रांताची सोय घटनादुरुस्ती करून शक्य झाल्यास कां करूं नये असें कमिशननें विचारलें. 'राज्य-पुनर्रचनेसाठीं कोणत्याहि प्रकारच्या घटनात्मक दुरुस्तीचे प्रश्न आम्ही निर्माण करीत नाहीं. कारण त्यामुळें राज्यपुनर्रचनेच्या मार्गांतील अडचणी वाढतील म्हणून आम्ही घटनेशीं सुसंगत अशीच मागणी ठेवली आहे. कमिशननें स्वतः घटनादुरुस्ती सूचित केल्यास आमची त्यास हरकत नाहीं' असें उत्तर देण्यांत आलें. महाविदर्भ, मराठवाडा, मुंबई व पश्चिम महाराष्ट्र अशा चार उपप्रांतांचें एक राज्य अगर या चार घटकांचें एक संघराज्य कां असूं नये, तुम्हांस तें पसंत पडणार नाहीं काय असाहि प्रश्न कमिशनच्या एका सदस्यानें केला. अशा स्वरूपाचे प्रश्न केल्यामुळें राज्यपुनर्रचनेच्या प्रश्नाबाबत ते किती गंभीरपणें विचार करीत आहेत याबद्दल शंकाच निर्माण होते.












कारण राज्यशास्त्राचें व घटनाकायद्याचें पूर्ण ज्ञान असणाऱ्या लोकांनीं असे कांहीं प्रश्न विचारावेत याचें आश्चर्य वाटतें. संघराज्यांत पुनः पोटसंघराज्यें ही गोष्ट कितपत शक्य आहे ? त्यामुळें चेष्टा करण्याच्या उद्देशानें तर हे प्रश्न विचारले जात नाहींत ना ?—अशी शंका येते. महाविदर्भ व संयुक्तमहाराष्ट्र यांबाबत नाग-विदर्भांतील लोकमत अजमावण्याचा कांहीं पर्याय शोधण्याचा विचारहि कमिशनच्या बोलण्यावरून दिसला. सार्वमताचें स्वरूप न येतां हें लोकमत कसें कळूं शकेल ? या प्रश्नावर लोकमत अजमावणें जरूर भासलें तरी एकभाषिक प्रदेशाची तसें कोणतेंहि महत्त्वाचें कारण नसतांना दोन राज्यें कां करावींत हाच खरा मुद्द्याचा प्रश्न आहे. केवळ कांहीं ऐतिहासिक परिस्थितीमुळें आज लोकमत विरुद्ध असलें तरी त्या प्रदेशाच्या भविष्यकालीन हितावर दृष्टि ठेवून योग्य ती व्यवस्थाच कमिशननें सुचविणें जरूर आहे. लोकांचीं मतें अगर ग्रह बरेचसे भूतकाळांतून निर्माण झालेले असतात. अशा वेळीं भविष्यकालीन व्यवस्था करणाऱ्या तत्त्वज्ञांनीं भूतकालाला कितपत महत्त्व द्यावें ? त्यांनीं भविष्याकडे नजर ठेऊन आपले निर्णय देणें अवश्य आहे व भूतकालोद्भव विरोधी विचारप्रवाहांना त्यांनीं भविष्यकालीन हिताच्या दृष्टीनें योग्य तें वळण लावणें अवश्य आहे. या दृष्टीनें कमिशनच्या सदस्यांवर मोठी जबाबदारी आहे. त्यांनीं तत्त्वज्ञदृष्टीनें आपले निर्णय देणें अवश्य आहे लोकशाहींत लोकमताला योग्य वळण लावण्याची जबाबदारी तत्त्वज्ञपुढाऱ्यावर असते. ती टाकून लोकमताचा बाऊ हे तत्त्वज्ञच करूं लागल्यास लोकशाहीचें भवितव्य भयंकर ठरेल.

मुंबई शहाराचा प्रश्नहि तात्त्विक भूमिकेवरून सोडविला जाणें इष्ट आहे. मुंबई शहराचा प्रश्न आपापसांत विचारविनिमयानें कां सोडविला जात नाहीं असा प्रश्न कमिशननें केल्यावरून सं. म. परिषदेच्या अध्यक्षांनीं या प्रश्नाबाबत विरोधी बाजूच्या पुढाऱ्यांशीं वाटाघाटी करून कांहीं सर्वसंमत तोड काढण्याचा प्रयत्न केल्याची हकीगत निवेदन केली. पण त्या वाटाघाटींत फारशी प्रगति झाली नाहीं, एवढेंच नव्हे तर सुरवातहि होऊं शकली नाहीं. कारण, दोन पक्षांच्या दोन वेगळ्या भूमिका राहिल्यानें एकत्र विचार करणें शक्य झालें नाहीं. मुंबई शहर महाराष्ट्रांत राहून तेवढ्या शहरापुरते स्थानिक स्वायत्ततेचे जास्तींत जास्त अधिकार देऊं केल्यानें ह्या प्रश्नांत कांहीं तडजोड होईल अशी आशा करावयाची तर दुसऱ्या पक्षानें मुंबई महाराष्ट्रराज्याचा एक भाग आहे हें मानण्यास तयार असलें पाहिजे. पण ती त्यांची तयारी दिसेना. त्यामुळें कमिशनच्या सदस्यांना स्पष्टच सांगावें लागलें कीं आतां तिसरा कोणीतरी मध्यें पडल्याखेरीज या वाटाघाटींना चालना मिळणार नाहीं. कमिशन स्वतः ही जबाबदारी पत्करूं शकेल काय ? पण सध्यांतरी त्यांच्या बोलण्यावरून ही जबाबदारी ते कितपत स्वीकारतात हा प्रश्नच आहे.

## कांहीं विरोधी निवेदनांचा परामर्श

संयुक्तमहाराष्ट्र-परिषदेच्या निवेदनाशीं विरोधी अशीं निवेदनें कमिशनकडे गेलीं. त्यांमध्यें मुंबईच्या स्वयंनिर्मित नागरिकसमितीचें, मुंबई-प्रदेश-कॉंग्रेस-कमिटीचें, गुजरात-प्रदेश-कॉंग्रेस-कमिटीचें, इंडियन मर्चंट चेंबरचें व महागुजरात-समितीचें—हीं प्रमुख होत. पैकीं महागुजरात-समितीनें भाषावार राज्यांचें तत्त्व मान्य केलें असून त्यांचा विरोध मुंबई महाराष्ट्रांत जाण्यास असून त्याचें एक स्वतंत्र राज्य करावें असें त्यांनीं मांडलें आहे. बाकीच्या निवेदनांत भाषावार राज्यांच्या तत्त्वासच विरोध करण्यांत आला असला तरी त्यांचा मुख्य विरोध मुंबई शहराबाबत आहे. कारण त्यांनीं कर्नाटकाचें भाषावार राज्य होण्यास संमति दिली आहे. या निवेदनांत मांडलेल्या मुद्द्यांचें सविस्तर खंडन स्थलाभावास्तव येथें करणें शक्य नाहीं. परंतु या सर्वांचा विरोध मुख्यतः मुंबई महाराष्ट्रांत असण्याबाबत आहे. त्यांच्या बऱ्याच मुद्द्यांचें सं. म. परिषदेच्या निवेदनांत खंडन झालेलेंच आहे. आणि या सर्व निवेदनांचा आणखी एक विशेष म्हणजे मुंबईच्या उत्तरेकडील ठाण्याचे समुद्रकांठचे चार तालुके गुजरातमध्यें घालावेत, कारण तेथील भाषा मूलतः गुजराती आहे—ही मागणी होय. अर्थात् सरकारी शिरगणतीचा पुरावा त्यांस संमत नाहीं. हा सर्व खटाटोप गुजरातची सरहद्द मुंबईशीं भिडविण्यासाठीं आहे हें कोणाच्याहि लक्षांत येईल. पण या त्यांच्या उपद्व्यापामुळें ठाणें जिल्ह्यांतील मराठी-भाषिकांना जागरूक राहून आपली बाजू कमिशन-








पुढें मांडावी लागली. डांगचें शिष्टमंडळहि कमिशनसमोर येऊन त्यांनीं डांगी लोक मराठीभाषिक असल्याचेंच सांगितलें. सध्यांचें मुंबई राज्य असेंच ठेवावें, वाटल्यास कर्नाटकाचें वेगळें राज्य होऊं द्यावें अशी या निवेदनांची भूमिका आहे. ‘ कर्नाटक गेल्यानंतर उरलेल्या मुंबई-राज्यांत महाराष्ट्रीयांचें संख्याधिक्य होईल व त्यामुळें गुजराती-मराठी अशा मिश्र-भाषिक राज्यांत तुमच्या हितसंबंधास कोणताहि धोका पोंचण्याचा संभव नाहीं – मग ही स्थिति तुम्ही कां पसंत करीत नाहीं ’ असा सं. म. परिषदेच्या शिष्टमंडळास कमिशननें प्रश्न केला असतां मिश्र-भाषिक प्रांतांत आमच्यावर कांहीं अन्याय होतो व आमचे हितसंबध सुरक्षित राहात नाहींत या मुद्द्यावर आमची भाषिक प्रांताची मागणी आधारलेली नसून मागें सांगितलेल्या भाषिक राज्यांतील मौलिक गुणामुळेंच ती करण्यांत येत आहे असें परिषदेच्या प्रवक्त्यांनीं सांगितलें. संयुक्त-महाराष्ट्र-परिषदेच्या निवेदनाशीं आणखी विरोधी निवेदनें म्हणजे महाविदर्भवादी अणे-ब्रियाणी-प्रभृतींचीं भाषिक तत्त्वें त्यांना मान्य असून त्यांचा भर एका भाषेचे दोन प्रांत होऊं शकतात यावर आहे. आणि त्यासाठीं श्री. अण्यांनीं महाविदर्भ सांस्कृतिक व सामाजिक दृष्ट्या पश्चिम महाराष्ट्रापासून वेगळा आहे हें दाखविण्याचा प्रयत्न केला आहे. पण श्री. अण्यांच्या निवेदनांत कोणताहि तात्त्विक मुद्दा नसून त्यांतील विधानें कोणत्याहि ऐतिहासिक वा प्रत्यक्ष पुराव्यावर आधारलेलीं नाहींत. तसेंच त्यांनीं त्यांत उपस्थित केलेल्या इतर अनेक खऱ्याखोट्या प्रश्नांकडे विशेष लक्ष देण्याचीहि गरज नाहीं.

कमिशन सध्यां चौकशी करीत आहे. चौकशीनंतरचे त्यांचे निर्णय लोकांचें कितपत समाधान करूं शकतील याबद्दल आज कांहींच सांगतां येत नाहीं. कमिशनचे एक सभासद म्हणाल्याप्रमाणें ही सर्वस्वीं न्यायालयीन स्वरूपाची चौकशी नव्हे. एकंदरीनें हा सर्व प्रश्न राजकीय आहे व त्यामुळें जे निर्णय विशुद्ध राजकीय तत्त्वांच्या कसोटीवर व कल्याणकारी लोकशाहीच्या ध्येयदृष्टीवर आधारले असतील तेच टिकाऊ ठरतील.

---

## अश्राप —!

मला देव नाहीं मला देश नाहीं
सांगावया नांव ताता नसे
जगावें करंटें, मरावें करंटें
न प्रीति हंसे वा न प्रीति रुसे
मिळाला कुठें भाकरीचा न कोर
भुकेला रुखे ओठ मी चावले
उण्या जीवनाचीं पुरीं वीस वर्षें
लिळावास काढूनिही पाहिले
‘ क्या शक्स कोई न नीलाम लेगा ? ’
तिन्ही वार सैतान घे हांसुनि
साध्या मनाचे सिधे बोल आले
‘ हो रे लुटारू, लुटारू खुनी ! ’
झालें अखेरीस जें व्हायचें तें
फांसावरी हें मिटें जीवन
तरारून येतात रोपें विखारीं
माझ्याच अश्राप मातींतुन

— देवदत्त दाभोलकर

( हंगेरिअन कवि Attila Jozsef यांच्या ‘Innocent Song’ या कवितेचा मुक्त अनुवाद ).

## संध्या आली दारीं —!

येथें मी बसलेलों
गच्चीवर एकान्तीं
बाजूचें हें झाड
सळसळ गातें गीत.

मावळतीला दूर
लाल गेरुवा रंग
तुरळक मेघांमधुनी
झिरपत आला लांब.

छटा तयांच्या कांहीं
ओढयामाजीं लवल्या
चुंचुन गढूळ पाणी
माझ्याजवळी आल्या.

एक उगवली तारा
साथीला ये दुसरी
गीत तमाचें गात
संध्या आली दारीं.

— गणेश कुडे












श्री. मधुकर जावडेकर

# बँक-निवाड्याची कहाणी

लोकशाही राजवटीचे जे रंग-ढंग वारंवार दृष्टोत्पत्तीस येतात त्यापैकींच एक महत्त्वाचा प्रसंग ऑगस्ट-सप्टेंबरमध्यें आपल्या राजधानींत पहावयास मिळाला. हा प्रसंग म्हणजे बँक-कामगारांनीं आपल्या मागण्या मांडण्यासाठीं केलेलीं निदर्शनें व त्यांची फलश्रुति होय. निदर्शनें, मोर्चा आणि इतर गोंधळ कांहीं नवा नाहीं व त्याबद्दल विशेष कांहीं वाटण्याचें प्रयोजनहि नाहीं. पण वर उल्लेखिलेल्या प्रश्नावर भारतीय संसदेंत सुश्राव्य चर्चा झाली व त्या चर्चेचें स्पूरुपहि मोठ्या नाट्यपूर्ण घटनेनें वाजलें. त्यामुळें बँक-कामगारांच्या मागण्या व त्या प्रश्नाचा अभ्यास यापलीकडे एक आगळें महत्त्व या सर्व घटनेस प्राप्त झालें.

२४ ऑगस्ट १९५४ रोजीं सरकारनें एका हुकुमान्वयें बँक-निवाड्यांत ( लेबर अपेलेट ट्रायब्यूनलच्या २८ एप्रिलच्या निर्णयांत ) कांहीं फेरफार जाहीर केले. ते कामगारांच्या बाजूनें नसून बँकांच्या बाजूनें होते. ते जाहीर झाल्यापासून कामगारांनीं प्रचंड मिरवणूका काढल्या, मशाली पेटविल्या, इतर कामगार-संघटनांची साथ मिळवली व सरकारी हुकुमाविषयीं आपली नापसंती प्रगट केली. नंतर एक मोर्चा काढण्यांत आला. तो पंतप्रधान नेहरूंच्या निवासावर गेला. श्री. नेहरूंनीं कांहीं प्रतिनिधींना मुलाखत दिली व त्यांचें अंमळ सांत्वन केलें. नंतर या प्रश्नावर संसदेंत चर्चा व्हावी अशी मागणी संसदीय मजूर-पूढाऱ्यांनीं केली. त्याप्रमाणें ३० ऑगस्ट रोजीं ही चर्चा ठेवण्यांत आली. श्री. हिरेन् मुकर्जी व श्री. अशोक मेहता या सभासदांनीं चर्चेस सुरवात केली. सभागृह भरून गेलें होतें. निदर्शकांची संख्याहि पुरेपूर होती. ' हाऊस फुल ' चा बोर्ड लागला होता. व तरी आंत प्रवेश मिळावा म्हणून बाहेर मोठी रांग उभीच होती. प्रामुख्यानें बँक-कामगारांचा भरणा या निदर्शकांत होता. हिरेन् मुखर्जी यांचें तल्लीन करणारें वक्तव्य टाळ्यांच्या प्रचंड गजरांत संपलें. श्री. मेहतांनीं श्री. मुखर्जींच्या सुंदर वक्तव्यास माहितीचा पुरवठा केला. नंतर बँकांची बाजूहि मांडण्यांत आली. अर्थमंत्री श्री. देशमुखांनीं मुद्देसूदपणें सर्व विषयावर प्रकाश टाकला व सरकारची बाजूहि मांडली. शेवटीं पुनः सरकारतर्फे उत्तर देतांना मजूरमंत्री श्री. गिरी यांनीं कामगारांची बाजू उचलून धरली व आपली मतभिन्नता जाहीर केली. नंतर कांहीं तासांनीं त्यांनीं मंत्रिपदाचा राजिनामा सादर केला. ( खिशांत राजिनामा ठेवूनच त्यांनीं संसदीय भाषण केलें म्हणतात ! ) पुनः कामगारांत उत्साहाची लाट पसरली. नवे मजूर-मंत्री श्री. खंडूभाई देसाई यांनीं कामगारांशीं बोलणीं केलीं. आतां सर्व विषय पुनः न्या. मू. राजाध्यक्ष यांच्याकडे अधिक विचाराकरतां पाठविला आहे. अजून २।३ महिने पुनः हा विषय अधांतरीं राहणार असें दिसतें.

बँक-कामगारांची संप करण्याची भाषा जरी कानावर येत असली तरीहि दीर्घ काल चालूं असलेल्या या एकंदर प्रकरणावरून संबंधित जनतेच्या लोकशाहीवर आधारलेल्या केवळ वैधानिक वागणुकीबद्दल आदर व समाधान वाटतें. या प्रचंड देशांतील विशिष्ट परिस्थिति व लोकशाहीचा नवीन प्रयोग यांविषयीं जों जों विचार करूं लागावें तों तों आपल्यावरील जबाबदारी व प्रश्नाची गहनता यांविषयीं धास्ती वाटल्यावांचून राहात नाहीं. ती प्रगट करण्याची संधि विचारवन्तांनीं कधींहि गमावली नाहीं. याविषयीं समाधानाचा पहिला परिस्फोट सुमारें तीन वर्षांपूर्वीं अतिशय व्यवस्थित रीतीनें पार पडलेल्या पहिल्याच प्रचंड निवडणुकीच्या यशानें या देशांत व परदेशांतहि झाला. त्यानंतर वेळोंवेळीं दृष्टोत्पत्तीस येणाऱ्या वर वर्णन केलेल्या घटनांवरून हा विश्वास बळकट होत राहतो. लोकशाहीचीं बीजें रक्तांत भिनावयाचीं तर अशा प्रकारचे धडे मिळतील तेवढे हवेच

आहेत. शांतता, वैधानिकता व संघटना यांवर आधारलेली ज्वलंत न्यायप्रीति व अन्यायाविषयीं चीड भरपूर पोसली जाणें जरूर आहे व तिचा वेळोंवेळीं आविष्कार करणेंहि जरूर आहे. याच उपायानें लोकशाहीची रखवाली करणाऱ्यांना अष्टौप्रहर जागरूक राहाणें अपरिहार्य होईल व अशा सौम्य द्वंद्वांतून मानवी कल्याणाला पोषक असणारीं चिरंतन मूल्यें पुढें रेटलीं जातील.

या दृष्टिकोणांतून पुनः एकदा पाहिलें तर ऑगस्ट-सप्टेंबरमधील राजधानींतील बँक-कामगारांचें वर्तन व तो संपूर्ण प्रसंगच वरील कसास उतरतो. एका न्यायसंस्थेचा निवाडा, त्यांतील सरकारी हस्तक्षेप, कामगारांच्या प्रचंड व 'ज्वलंत' (–मशालींची ही मिरवणूक मोठी सतेज दिसत होती ! –) मिरवणूकी, मोर्चे, संसदेंतील उत्कृष्ट चर्चा व त्या चर्चेची उच्च पातळी, मजूरमंत्र्यांचा विरुद्ध पक्षास पाठिंबा व मतभेदांतून बाहेर पडलेला राजिनामा आणि त्यांची दिसून आलेली तत्त्वनिष्ठा – साऱ्याच घटना सूत्रबद्ध व समाधानकारक वाटतात आणि या देशाच्या राजकीय भविष्याविषयीं विश्वास वाटूं लागतो.

हा झाला प्रस्तुत विषयाचा राजनैतिक व राज्यव्यवहारिक दृष्टिकोण. आतां बँक-निवाड्याची व एकंदर प्रश्नाची अर्थशास्त्रीय बाजू निःपक्षपाती दृष्टिकोणांतून पुढें मांडून निष्कर्षांची मुभा वाचकांवरच सोपवूं म्हणजे झालें.

## पूर्वपीठिका

बँक-कामगारांच्या तंट्यांचा इतिहास फारसा जुना नसला तरी भरपूर रोमांचकारी आहे. बँक-नोकराच्या संघटना अधिक शिस्तबद्ध तऱ्हेनें दुसऱ्या महायुद्धानंतर उभ्या राहिल्या. १९४६ सालच्या सुमारास त्यांनीं आपल्या मागण्यांचा मसुदा जाहीर केला. संपांच्या नोटिसा देण्यांत आल्या, संपहि करण्यांत आले. या चळवळींचा जोर प्रामुख्यानें मुंबई, उत्तर-प्रदेश, बंगाल या राज्यांत फोंफावला. त्या त्या राज्यांतील तत्संबंधी अधिकाऱ्यांनीं हे तंटे लवादाकडे सोंपविले व निर्णय घेतले. १९४७ मध्यें मुंबई राज्यांतील निवाडा न्यायमूर्ति दिवेटिआ यांचेकडे सुपूर्त करण्यांत आलेल्या झगडयाबद्दलचा होता. १९४७ – ४८ मध्यें बंगालांतहि कांहीं महत्त्वाचे निवाडे देण्यांत आले.

पण या उपायानें या रोगाचें निर्मूलन होण्याऐवजीं त्यानें मूळच धरलें. नोकरांची अधिकाची अपेक्षा वाढत राहिली. याचा परिणाम म्हणून बँकांनीं मध्यसरकारची मदत अपेक्षिली. सरकारनें १९४९ सालीं 'Industrial Disputes (Banking and Insurance Companies) Ordinance' वटहुकूम काढला. या वटहुकुमान्वयें अनेक राज्यांत ज्या बँकांच्या शाखा फैलावल्या आहेत त्यांवर सरकारचें नियंत्रण लागूं झालें. त्यानंतर १९४९ मध्यें सरकारनें एक तात्पुरतें लवाद या कामाकरतां नेमले. या लवादाचे चेअरमन श्री. सेन होते व इतर सभासदांत श्री. शर्मा व श्री. मुजुमदार होते. प्रसिद्ध सेन–निवाडा म्हणून हें लवाद व निवाडा प्रसिद्ध आहे. अखिलभारतीय बँकांच्या २०५ तंट्यांचा विचार या लवादानें केला. सेन-लवादानें आपला निवाडा १९५० मध्यें जाहीर केला. हें लवाद कामगारांना फार पसंत पडलें व त्याच्या निवाडयावर ते बेहद्द खूष होते. बँकांना हा निवाडा मान्य होण्यासारखा नव्हता. कारण बँकांचा ऑफिसखर्च त्यामुळें भलताच वाढणार होता. यास्तव बँकांनीं घटनेच्या १३६ कलमाखालीं सुप्रीम कोर्टाकडे निवाडयाविरुद्ध अपील केलें. सुप्रीम कोर्टानें सेन–लवाद घटनेंतील एका मुद्द्यावर ('ab initio') १९५१ मध्यें बेकायदा ठरविलें. लवादच बेकायदा ठरल्यानें दोन्ही पक्षांतील तंटा अनिर्णीत राहिला. यावर काय उपाय करावा हें कोणालाच सुचेना. पण राखेखालीं धगधगता निखारा असतांना त्याकडे कानाडोळा करणें कुणालाच सोयीचें नव्हतें. विशेषतः सरकारला ही अडचण अधिक जाचत होती. यांतून बाहेर पडण्याचा जो एकच मार्ग सरकारपुढें होता तो सरकारनें अनुसरला. १९५१ मध्यें इंडस्ट्रियल डिस्प्यूट्स (Amendment and Temporary Provisions) ॲक्ट पास करून सेन-लवादानें सादर केलेल्या वेतनश्रेणी सरकारनें अमलांत आणल्या.

नंतर म्हणजे १९५१ मध्यें पुनः एक लवाद नेमण्यांत आलें. श्री दिवेटिआ या लवादाचे चेअरमन होते. या लवादाच्या सभासदांनीं लवकरच राजिनामे दिले. पुनः १९५२ मध्यें एक लवाद श्री. शास्त्री यांच्यासह नेमण्यांत आलें. या शास्त्री-लवादानें आपला निर्णय

१९५३ मध्यें जाहीर केला. या निवाड्यावर नोकर व बँका या दोघांनींहि अपील केलें. या अपीलाचा निर्णय लेबर ॲपेलेट ट्रायब्यूनलनें २८ एप्रिल १९५४ मध्यें दिला. या निर्णयाचा स्वीकार होता तर बँकांचा आफिस-खर्च खूपच वाढता. निरनिराळया बँकांची खर्चाची जबाबदारी सुमारें ५ टक्क्यापासून ४५ टक्क्यापर्यंत वाढेल अशी तक्रार त्यांनीं केली. विशेषतः ग्रामीण विभागांतील बँकांना तर हा खर्च फारच डोईजड होण्यासारखा होता. या कारणाकरतां या निर्णयाविरुद्ध त्यांनीं एकच आवाज उठवला.

सरकारला प्रथम असा वास लागला असावा कीं याबाबत कांहींना कांहीं करणें जरूर आहे. Industrial Disputes - ( Appellate Tribunal ) Act, 1950 च्या अन्वयें निर्णय जाहीर झाल्यापासून ३० दिवसांच्या आंत सरकार त्या निवाडयांत फेरफार करूं शकतें किंवा तो निवाडा अव्हेरूंहि शकते. ही मुदत फार थोडी असल्यानें प्रथम २४ मे १९५४ रोजीं एक वटहुकूम काढून सरकारनें ती ३ महिने केली. पुढें २४ ऑगस्ट रोजीं एक हुकूम काढून लेबर ॲपेलेट ट्रायब्यूनलच्या निणयांत कांहीं फेरफार सरकारनें जाहीर केले. हे फेरफार कामगारांना पसंत न पडल्यानें नंतरच्या सर्व घटना घडून, नवीन मजूरमंत्र्यांनीं पुनः हें प्रकरण न्यायमूर्ति राजाध्यक्ष यांच्याकडे अधिक चौकशीसाठीं पाठविलें आहे. या वर्षअखेर ते आपली चौकशी सादर करतील अशी अपेक्षा आहे.

### सरकारच्या फेरफाराचें स्वरूप

सरकारनें ट्रायब्यूनलच्या निर्णयांत खालील मुख्य फेरफार केले :

१. अधिक ४ बढत्या देऊन सर्व ठिकाणीं शास्त्री-निवाडयाप्रमाणें वेतनश्रेणी राहातील.

२. शास्त्री-निवाडयाप्रमाणेंच महागाई भत्ता राहील.

३. तीस हजार किंवा कमी लोकसंख्येच्या विभागास चौथा विभाग म्हणून मान्यता व तेथें शास्त्री–निवाड्यांतील तिसऱ्या विभागाची पगारश्रेणी व महागाई लागू.

४. तीस हजार किंवा कमी लोकसंख्येच्या ग्रामीण विभागास (जेथें सेन–निवाडा लागूं नाहीं तेथें) निवाडा लागूं नसावा.

५. 'युनायटेड बँक ऑफ इंडिया' यांतून वगळावी.

६. कोणत्याहि परिस्थितीत ३१ जानेवारी १९५० ला असणारी पगारश्रेणी कमी न व्हावी –– वगैरे.

यांवरून असें दिसून येईल कीं सरकारनें बँकांना विशेष कांहीं सवलती दिलेल्या नसून अगदी आवश्यक त्याच दिल्या आहेत. सेन-निवाडा व शास्त्री-निवाडा यांमध्येंहि पुष्कळ तफावत होती व त्यांत शास्त्री-निवाडा अधिक शास्त्रशुद्ध होता असें आढळून येतें. उदाहरणार्थ, महागाईचाच विचार करूं. महागाईबाबत सेन-निवाडा इतका विक्षिप्त होता कीं तो फार काळ अमलांत राहाणें अशक्यच होतें. महागाईचे सर्वसाधारण दर ठरविण्याऐवजीं सेन-निवाड्यानें त्या त्या शहराच्या जीवनमान-निर्देशकांकावर ती अवलंबून ठेविली. याकरतां २२ ठिकाणचे हे निर्देशकांक मान्य केले. जेथें निर्देशकांक उपलब्ध नव्हता तेथें जवळचा जो असेल तो स्वीकारला. पण यामुळें अनेक अडचणी निर्माण झाल्या. म्हणजे उत्तर-प्रदेशांतील सीमा-शहरांची महागाई बिहारच्या श्रेणीप्रमाणें अस्तित्वांत आली. कानपूरला पगाराच्या ३५ ते ४० टक्के महागाई तर अमदाबादला अवघी ८ टक्के व मुंबईस ३० टक्के, असा विरोधाभास उत्पन्न झाला.

शास्त्री-निवाड्यानें ही चूक दुरुस्त केली. प्रमुख शहरांत किमान ३५ व कमाल ७० धरून पगाराच्या ३३ टक्के महागाई ठरविली. त्याशिवाय प्रादेशिक विभाग अस्तित्वांत आणून एक नवा 'ड' विभाग (खेळतें भांडवल १ कोटीपेक्षां कमी असलेल्या बँकांचा) कल्पिला. 'अ' विभाग २५ कोटीवर, 'ब' विभाग १० ते २५ कोटीमध्यें, 'क' विभाग १० कोटीखालीं, असे तीन विभाग करून शास्त्री-निवाडा 'क' विभागास लागू केला.

ले. ॲ. ट्रायब्यूनलनें तर शास्त्री-निवाड्यावर ताण केली आणि वेतनश्रेणी, महागाई वाढविली. ५० टक्क्यापासून महागाई सुरवात करून कमाल मर्यादा कायम केली नाहीं. याशिवाय वैद्यकीय मदत वगैरे अधिक सोयी आवश्यक ठरविल्या.

यावरून एक गोष्ट स्पष्ट होते कीं एकापुढें एक निवाडे बँकांवा आर्थिक बोजा वाढवीतच गेले. बँकांची जबाबदारी ध्यानीं घेण्याचें महत्त्व त्यांना वाटलें नाहीं. ज्या सरकारी हुकुमान्वयें सरकारी फेरफार सुचविण्यांत

आले त्यामुळें बँकांना कांहीं विशेष सवलती मिळाल्या असें नसून त्यांच्यावरील बोजा किंचित् कमी झालेला आहे इतकेंच.

सरकारी हस्तक्षेपावर जे आक्षेप आहेत ते हे कीं, त्रयस्थ अशा लवादनिर्णयांत सरकारनें हस्तक्षेप करावाच का ? केल्यास नोकरांना विघातक असे फेरफार करावेत काय ? आणि प्रस्तुत फेरफार त्या दृष्टीनें कितपत न्याय्य आहेत ?

यांचा विचार करण्यापूर्वी एक गोष्ट सांगावयाची ती ही कीं यापूर्वी एक-दोन वेळां सरकारनें नोकरांना फायदेशीर असे फेरबदल केले आहेत. त्यावेळीं तात्त्विक मुद्द्यावर सरकारला विरोध कोणी केला नाहीं. यावेळीं सरकारी हस्तक्षेप अंमळ बँकांच्या बाजूनें असल्यानें ही ओरड विशेष आहे.

### बकांच्या उत्पन्नाची घसरगुंडी

रिझर्व्ह बँकेनें प्रसिद्ध केलेल्या खालील आंकड्यां-वरून बँकांच्या घसरत्या उत्पन्नाची, वाढत्या खर्चाची व म्हणून घटत्या नफ्याची कल्पना येते.

रिझर्व बँकेच्या प्रकाशनांत म्हटलें आहे कीं शेड्यूल्ड बँकांचा नफा १९४९ मध्यें ७.८८ कोटी रुपये होता तो १९५३ मध्यें ६.५२ कोटी झाला. नॉन् - शेड्यूल्ड बँकांचा नफा याच कालांत ४२.६ लाखावरून ३३ लाखांवर आला. विनिमयबँकांचा नफा ४.५७ कोटीवरून २.६२ कोटीवर घसरला. या पडत्या नफ्याचें मुख्य कारण कामाची कमतरता व वाढता खर्च हींच आहेत.

उलट पक्षीं, बँकांचा खर्च मात्र झपाट्यानें वाढत राहिला आहे. खालील कोष्टकावरून याची कल्पना येते. इथें आणखी असें सांगायचें आहे कीं बँकांचा हा खर्च प्रगत देशांतील खर्चाहूनहि जास्त आहे. १९५२ मध्यें हिंदी शेड्यूल्ड बँकांचा ऑफिस-खर्च त्यांच्या ठेवीच्या रकमेच्या १·८ टक्के होता असें आढळून आलें. याच काळांत अमेरिकेंत हें प्रमाण फक्त ·८४ टक्के होतें. असेच इतर आंकडेहि अमेरिकेसारख्या श्रीमंत राष्ट्राच्या मानानें हिंदुस्थानांत डोईजड असल्याचें निःसंशय दिसून येतें. हें प्रमाण ॲपेलेट ट्रायब्यूनलचा निवाडा स्वीकारला असता तर सुमारे १५ टक्के वाढलें असतें अशी बँकांना भीति वाटते.

या दोन गोष्टी बरोबरच तिसरी गोष्ट लक्षांत घ्यावयाची ती अशी कीं बँकांच्या शाखांची संख्याहि या कालांत घटलेलीच आहे. १९४६ मध्यें हिंदी संघराज्यांत एकूण शाखा ४८८६ होत्या, १९५३ मध्यें त्या ४०३६ उरल्या आहेत. ८५० बँकांना आपला कारभार गुंडाळावा लागला. ॲपेलेट ट्राय०चा निवाडा अस्तित्वांत येता तर आणखी १० टक्के तरी बँका बंद कराव्या लागल्या असत्या. म्हणजे दरएक बँक-आफिस-मध्यें १० नोकर समजल्यास, ४००० नोकरांवर बेकार होण्याची पाळी येती. कदाचित् हा आंकडा अधिकच होता पण कमी नाहीं.

---

१

बँकांच्या उत्पन्नाची घसरगुंडी ( आंकडे लाख रुपयांचे )

| | १९४६ | १९४८ | १९५१ | १९५३ |
|---|---|---|---|---|
| १. एकूण नफा | १९४८·१ | २२१३·१ | २४६८·५ | २४६८·८ |
| २. खर्च | ६९८·८ | ९५०·१ | ११९८·६ | १३२५·९ |
| ३. इतर खर्च–( घट इ० ) | ३१३·२ | ४५५·७ | ५१९.० | ४९१·२ |
| ४. वट्ट नफा | ९३६·१ | ८०७·३ | ७५०·९ | ६५१·७ |
| शेंकडेवारी | | | | |
| २ : १. | ३५·८७ | ४२·९३ | ४८·५५ | ५३·७. |
| ३ : १. | १६·०७ | २०·५९ | २१·०३ | १९·८८ |
| ४ : १ | ४८·०६ | ३६·४८ | ३०·४२ | २६·३१ |
| २ : ( २+३ ) | ६९·०५ | ६७·५८ | ६९·७८ | ७२·९६ |

— ‘ Statistical Tables relating to Banks in India ’ ( Published by the Reserve Bank of India ) वरून.

## बँक-नोकर कीं असंख्य ठेवीदार ?

आतां याच प्रश्नाची आणखी एक बाजू पाहू. इतर उद्योगधंद्यांत व बँकांत एक फरक असा कीं, बँकांची सारी शक्ति जनतेच्या ठेवीरूप पैशांत आहे. जनतेच्या पैशाचे विश्वस्त म्हणजे बँका. नाणेबाजारांतील पैसा-पुरवठ्याच्या पायतळीच्या इमारतीचा दगड म्हणजे बँका. ही इमारत केवळ विश्वासावर आधारलेली आहे. जनतेचा पैसा संभाळावयाचा तर आवश्यक ती सर्व काळजी घेणें जरूर आहे. याकरितां नफ्यांतून, गुंतवणुकीवर घट, बुडणारीं कर्जें व इतर अतर्क्य अडचणी यांना तोंड देण्यासाठीं तरतूद करणें जरूर आहे. घटत्या नफ्यामुळें ही बाजू लंगडी पडत असल्यास नवल नाहीं.

दुसरें असें कीं, बँक-नोकर व ठेवीदार जनता यांपैकीं अधिक जवळ कोण आहेत याचाहि विचार बँकांना करणें प्राप्त आहे. नोकरांच्या मानानें खातेदारांची व भागीदारांची संख्या खूपच मोठी आहे. हे आंकडे २६ बँकांच्या बाबत गोळा केले होते ते उद्बोधक आहेत. या २६ बँकांत ( २-३ बँका सोडून ) ठेवीची रक्कम ५ कोटीवर आहे. या बँकांची नोकर-संख्या ३०२७७ आहे. खातेदार-संख्या २३,१९,३५९ आहे व भागीदार १,११,४६६ आहेत. म्हणजे नोकरांच्या ७६.६० पट खातेदार आहेत, ३.६८ पट भागीदार आहेत.

कामगार-कल्याण नाकबूल नसलें तरी अधिक जागरूक कोणाच्या हिताकरतां राहावयास पाहिजे तें वरील आंकड्यावरून स्पष्ट होतें.

आणखी एक महत्त्वाचा मुद्दा सिद्ध करण्यासाठीं कांहीं आंकडे देतों. वर सांगितलेंच आहे कीं बँकांच्या पाठीचा कणा म्हणजे जनतेचा विश्वास होय. तो ढांसळला कीं बँकांची इमारत जमीनदोस्त होण्यास विलंब नाहीं. बँकांच्या शेअर्सना बाजारांत येणारी किंमत पाहूं, म्हणजे हा भाग आपोआप सिद्ध झाला. कांहीं महत्त्वाच्या बँकांच्या शेअर्सना १९४७ ते १९५४ मध्यें बाजारांत उतरत्या किंमती आल्या आहेत. याच काळांत औद्योगिक शेअर्सना मात्र चांगला वाढता भाव आला आहे. पुनः हें आश्चर्याचें आहे कीं औद्योगिक शेअर्सवर डिव्हिडंड कमी-अधिक दिला गेला आहे तर बँकांचा डिव्हिडंड-दर कायम राहिला आहे. असें असूनहि बँक-शेअर्सना भाव आलेला नाहीं. याचा अर्थ एकच होतो कीं जनतेचा या गुंतवणुकीवरचा विश्वास उडत आहे. आणि सद्यःस्थिति कायम राहिली तर तो अधिकच उडून जाईल. कांहीं बँकांचे आंकडे खालीं दिलेले आहेत.[२] त्यांवरून आपोआपच हें सिद्ध होतें कीं, बँकांचा आफिस-खर्च एकसारखा वाढत आहे, जनतेचा बँकांच्या शेअर्सवरील विश्वास उडत आहे, ग्रामीण विभागांतील बँकांना तर जगणेंच अशक्य आहे, बँकांच्या शाखा बंद होत आहेत आणि त्याबरोबरच नोकरांच्या अधिक वेतनाच्या मागण्या वाढत आहेत. नाणे-बाजारांतील अतिशय संवेदनक्षम अशी ही संस्था अनिश्चित वातावरणांत वावरत आहे.

| २ इंपीरीयल बँक | १९४७ | १९५० | १९५१ | १९५३ |
|---|---|---|---|---|
| १ कमाल किंमत | ५६० | ४९३ | ४७० | ४३५ |
| २ डिव्हिडंड | १७% | १६% | १६% | १६% |
| **सेंट्रल बँक** | | | | |
| १ क. किं. | १५० | ९१½ | ८१ | ७१½ |
| २ डि. | १४% | १४% | १४% | १४% |
| **बँक ऑफ बरोडा** | | | | |
| १ क. किं | २०० | १२६ | १३१½ | १२९½ |
| २ डि. | १२% | १२% | १२% | १२% |
| **बँक ऑफ इंडिया** | | | | |
| १ क. किं. | २६४ | १८५ | १८८½ | १७५ |
| २ डि. | १४% | १४% | १३% | १४% |

तर मग कामगारांची सरकारी हुकुमाबद्दल्ची तीव्र नापसंती सर्वस्वीं अन्याय्य होती असें म्हणतां येईल काय ? तसें मला वाटत नाहीं. आम जनतेची शारीरिक व बौद्धिक पिळवणूक अष्टदिशांना चालत असलेली मी जर प्रत्यहीं पहातों, तर उपरिनिर्दिष्ट प्रश्नावरच डोळयावर कातडें ओढून कितीसें स्वास्थ्य मिळणार आहे ? पण प्रश्न आहे तो असा कीं कोणाचा पैसा वाटावयाचा आणि नोकरांना सुसह्य जीवनमान देणारें वेतन देण्यास पैसा कोठून उभारावयाचा ? मूठभर धनिकांनीं असंख्य श्रमिकांना अहर्निश पिळावें ही तर साऱ्या संसाराचीच शोककथा आहे. ती निपटून काढलीच पाहिजे यांत संदेह नाहीं. बँक-नोकरांच्या प्रश्नाबाबत अपवाद करण्याचें अटळ वाटतें तें अशासाठीं कीं बँका उद्योगधंद्यांच्या मानानें अधिक सामाजिक संस्था आहेत. मूठभर मालकांनीं स्वार्थाची शीग पुरेपूर भरण्यासाठीं चालवलेलीं तीं खाजगी पिळवणूकगृहें नव्हत. दुसरें असें कीं, बँकांचा व्यवहार गोंधळाचा होतांच, उभा नाणेंबाजार खळबळून निघण्यास विलंब लागत नाहीं. दिवाळखोर बँकांचा अनिष्ट काळ जनतेच्या स्मरणांत अद्याप ताजा आहे. वेळीं, पोटीं कांटे भरूनहि पै-पैसा शिल्लक टाकणाऱ्या बहुसंख्य जनतेची बँक ही विश्वस्त-कोठी आहे. नोकरांच्या मागण्या असह्य वाटल्यानें बंद होणाऱ्या बँका या ठेवीदारांच्याहि आहुती घेतल्याशिवाय कशा राहातील ? जनतेची बँकिंगची प्रवृत्ति या देशांत कमी आहे ती वाढणें जरूर आहे. बहुसंख्य नोकरांच्या मानानें बँकांतील थोडे वरिष्ठ अधिकारी लठ्ठ पगार व भत्ते गिळंकृत करीत आहेत हें जरी खरें असलें तरी त्याचा फाजील बाऊ करण्यांत अंमळ बालिशता आहे. ब्रिटिशांचें राज्य वाईट कां तर इंग्रज आपले लोक भारतांत आणून, त्यांना व्हाईसरॉय, गव्हर्नर, कलेक्टर करतात व त्यांच्या लठ्ठ पगाराच्या मिषानें येथला पैसा आपल्या देशांत नेऊन आम्हास थोडा पैसा शिल्लक ठेवतात व गरीबी भोगावयास लावतात — असा एक 'प्राथमिक' धडा मागें सर्वांनाच शिकवला जात होता. पण हळुहळु आम्हांस उमगलें कीं इंग्रज लोक इतके थोडेच वाईट नसून पुष्कळच 'दुष्ट' आहेत ! आज अगदी सरकारी नोकरसुद्धां वेतनांतील प्रचंड विषमतेचे बळी आहेत. मी तर असेंच म्हणतों कीं, बँक-नोकरांनीं आपली उत्कृष्ट बाजू या गैरलागू मुद्द्यानें बिघडवून टाकूं नये. नोकरांची शिस्तबद्ध व सामर्थ्यवान् संघटना उभारणें अत्यावश्यक आहे. या दराऱ्याचा अंकुश बेलगाम डायरेक्टर-बोर्डावर सातत्यानें तळपत राहिल्यास तें अनाठायीं होणार नाहीं. पण या शक्तीचा वापर करून बँकांना आपला विस्तारच आटोपता करावयास भाग पाडणें दूरदृष्टीचें होणार नाहीं. कांहीं असलें तरी अस्तित्वांत असलेल्या नोकरांना अधिक पगार देण्यापुरताच हा प्रश्न मर्यादित नसून कामगार-विरुद्ध-बेकार असाच हा प्रश्न अधिक आहे हें कामगारांनींहि डोळयाआड न केलेलें बरें.

---

## सुरावट जमली खर्जांत — !

करवंटीवर ताणुन तारा
        वांकवुनी केसांत कामटी
नरम-गरम काढीत सुरावट
        जीवन फिरतें पोटापाठीं !
सूर्यासंगें सुरूं होतसे
        पायपीट ती पंगुळवाणी
अन् रजनी पाठीस घालुनी
        दमुनी परते करुण कहाणी !
कच कचकचतां तांतीवरतीं
        घुमते तार-स्वरांत किरकिर
कठोर थट्टा करित जिण्याची
        साथ संसृती करि त्या भेसुर !
एक खर्ज तर दुसरा पंचम
        काल-समेची कुठें न सांगड
सदा लढाई हातघाइची
    वंचित शिव, भव विजोड, अवघड !
किरकिर, पिरपिर यांसह भिरभिर
        अविचल, अविरत धांवत जीवित
करित कुचेष्टा कळिकाळाची
        कण-कण काया करपे कष्टत !
आयुष्याच्या घटिका घटती
        प्रपंच, पालन, पोषण यांवर
कांचत ताणांवरी दुहेरी
        तूर्ण जीर्ण हो शीर्ण कलेवर !
                — आणि अखेरीं एके दिवशीं —
फुटली करवंटी जाहल्या तारा निःशब्द !
अंती दोघांची सुरावट जमली खर्जांत !

— मधुकर घोलप



अनुक्रमणिका




राज्य मराठी विकास संस्थाद्वारे संगणकीकृत




द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

स्व. रवीन्द्रनाथ ठाकूर. अनुवादक : आचार्य स० ज० भागवत

# विदाय अभिशाप

[ देवांच्या आदेशानुसार बृहस्पतिपुत्र कच हा दैत्यगुरु शुक्राचार्यांजवळून संजीवनी विद्या शिकण्याच्या निमित्तानें त्यांच्याकडे जातो. तेथें हजार वर्षें घालवून नृत्य-गीत-वाद्य यांच्या द्वारें शुक्रदुहिता देवयानीचें मनोरंजन करतो आणि सिद्धकाम झाल्यावर देवलोकीं परत जाण्यास निघतो. देवयानीचा निरोप घेतांना घडलेला प्रसंग पुढें वर्णिला आहे. ]

**कच** : देवयानी, हा दास देवलोकीं प्रयाण करीत आहे. त्याला आज्ञा दे. आज माझा गुरुगृहवास समाप्त झाला. मेरुपर्वताच्या शिखरावर सूर्य आपल्या अक्षय किरणांनीं जसा तळपत राहातो त्याप्रमाणें मी जी विद्या शिकलों ती माझ्या अंतरांत उज्ज्वल रत्नासारखी चिरकाल प्रज्वलित राहील असा मला आशीर्वाद दे.

**देवयानी** : तुझे मनोरथ पूर्ण झाले. आचार्यां-कडून दुर्लभ विद्या तूं मिळविलीस. सहस्रवर्षांची तुझी दुःसाध्य साधना आज सिद्ध झाली. आणखी कसलीहि कामना नाहीं ना ? मनांतल्या मनांत विचारून पाहा बरें !

**कच** : नाहीं ! आणखी कसलीहि नाहीं.

**देवयानी** : कसलीहि नाहीं ? तरी देखील आणखी एकदां पाहा बघूं. हृदयाच्या तळापर्यंत बुडी मारून शोध घे. अंतःकरणाच्या एखाद्या कोपऱ्यांत एखादी वांछा राहिली असेल, कुशांकुराप्रमाणें क्षुद्र, दृष्टीला अगोचर, तरीपण अत्यंत तीक्ष्ण !

**कच** : माझें जीवन आज पूर्ण कृतार्थ झालें आहे. सुलक्षणे, माझ्यामध्यें कोठेंहि कसलेंहि दैन्य, कसलीहि उणीव उरलेली नाहीं.

**देवयानी** : त्रैलोक्यांत तूं सुखी आहेस ! तर मग मस्तक उंच करून अभिमानानें आपल्या कार्यासाठीं इंद्रलोकीं जा. स्वर्गपुरींत आनंदध्वनि उठतील, मनोहर सुरांनीं मंगल शंख वाजतील, सुरांगना तुझ्या शिरावर नंदनवनांतील सद्यःछिन्न मंदारमंजरींचा आणि पुष्पांचा वर्षाव करतील. स्वर्गपथावर अप्सरा आणि किन्नरी आपल्या मधुरकंठांनीं हुलुध्वनि करतील. अरेरे ! ब्राह्मणा, येथें विजनांत, विदेशांत, कठोर अध्ययन करण्यांत, तुझे दिवस फार क्लेशांत गेले, नाहीं ? तुझ्या सुखमय घराची आठवण करून देण्याला आणि विजनवासांतील दुःख निवारण करण्याला येथें कोणी नव्हतें. या दरिद्रकुटीरांत जें कांहीं होतें त्यानें मीं अतिथीची पूजा केली. तरीपण येथें स्वर्गसुख कोठून आणूं ? सुरललनांचें सुन्दर मुख येथें कोठलें ? मला मोठी आशा आहे कीं, सुखलोकीं परत गेल्यावर या आतिथ्यांतील उणिवा विसरून जाशील !

**कच** : आज तूं या दासाला कल्याणमय हास्यानें, प्रसन्नपणें निरोप द्यावयास हवा.

**देवयानी** : हास्य ? हाय ! सख्या ! ही कांहीं स्वर्गपुरी नव्हे. येथें पुष्पांतील कीटकाप्रमाणें अंतःकरणांत तृष्णा जागृत असते. मिटलेल्या कमळाभोंवतीं लांछित भ्रमर जसा वारंवार फिरत राहातो तशी येथें वांछिताच्या भोंवतीं वांछा सारख्या घिरट्या घालीत राहते. या ठिकाणीं सुख नाहींसें झाल्यानंतर शून्यगृहा-मध्यें स्मृति एकाकिनी बसून दीर्घ उसासे सोडीत असते. येथें हास्य सुलभ नाहीं. जा मित्रा, निष्कारण वेळ नासून काय होणार ? — देवगण उत्कंठित झाले असतील......

काय ? खरंच निघालास ? दोन शब्द बोलून सगळें संपलें का ? हजार वर्षें राहिल्यानंतर हेंच कां निरोप घेणें ?

**कच** : देवयानी, माझें काय चुकलें ?

**देवयानी** : हाय, या सुन्दर अरण्यभूमीनें हजार वर्षें आपली प्रेमळ छाया दिली; पल्लवमर्मर व विहंग-कूजन ऐकविलें. तिला आज इतक्या सहजीं तूं सोडून जाणार ? तरुराजि जणूं म्लान झाली आहे. पाहा, आज गाढतर शोकानें वनच्छाया काळी झाली आहे, वायु क्रंदन करीत आहे, शुष्क पानें गळून पडत आहेत.

मूळ बंगाली. लेखनस्थल : कालिग्राम. लेखनकाल : २६ श्रावण १३०० ( इ. स. १८९३ ).








तूंच केवळ सहास्य अधरांनीं निशान्तींच्या सुखस्वप्ना-प्रमाणें निघून जाणार ?

**कच :** देवयानी, या वनभूमीला मी मातृभूमि मानतों. येथें मला नवजन्म लाभला. हिच्याविषयीं मला अप्रेम नाहीं. — चिरप्रीतीनें मी हिचें चिरकाल स्मरण ठेवीन.

**देवयानी :** हेंच तें वटतल. येथें तूं प्रतिदिवशीं गो-धन चारण्यासाठीं येत असस. येथेंच मध्याह्नींच्या प्रखर उष्म्यांत तूं झोपीं जात होतास. अशा वेळीं तुझ्या क्लान्त कायेवर अतिथिवत्सल तरु दीर्घ छाया पसरवीत असे. झर्झरध्वनि करणाऱ्या, पल्लवदलांनीं हलकें हलकें मृदु स्वरानें, वारा घालून तो तुला सुखनिद्रा आणून देई. जा सख्या, पण या परिचित तरुतळीं कांहीं क्षण अखेरचें बसून घे. या स्नेहछायेचा निरोप घेऊन जा. दोन घटका थांबून जा. एवढ्या विलम्बानें तुझ्या स्वर्गाची कांहीं क्षति होणार नाहीं !

**कच :** हे सर्व चिरपरिचित मित्रगण आतां निरोप घेण्याच्या क्षणीं जणूं अभिनवच भासत आहेत. पळून चाललेल्या प्रियजनाला बांधण्यासाठीं व्यग्र स्नेहभरानें सर्वजण अंतिम विनवणीचें, अपूर्व सौंदर्यराशीचें, नूतन बन्धनजाल पसरवीत आहेत. हे वृक्षराजा, आश्रित जनांच्या मित्रा, तुला माझा नमस्कार ! तुझ्या छायेंत कितीतरी पांथ येऊन बसतील. माझ्याप्रमाणें कित्येक छात्र कित्येक दिवस तुझ्या नीरव, निर्जन, प्रच्छन्न छायेंत, तृणासनीं, पतंगांच्या मृदुगुंजस्वरांनीं अध्ययन करतील. प्रातःस्नानानंतर तुझ्या शाखांवर ऋषिबालकें येऊन आपली सजल वल्कलें सुकवितील; मध्याह्नीं गुराखी लोक खेळ खेळतील. अरे, त्यांच्यामध्यें या जुन्या-पुराण्या मित्राची आठवण तुला राहूं दे !

**देवयानी :** आपल्या होमधेनूची आठवण ठेव. स्वर्गसुधेचें पान करीत असतां, गर्वानें त्या पुण्य गाय-त्रीला विसरूं नकोस.

**कच :** सुधेहून सुधामय तिचें दूध ! जिच्या दर्श-नानें पापक्षय होतो अशी ती मातृरूपा, शान्तिस्वरू-पिणी, शुभ्रकान्ति पयस्विनी ! क्षुधा, तृष्णा, श्रान्ति यांची पर्वा न करितां मी तिची सेवा केली आहे. गहन काननांत कोंवळें गवत असलेल्या स्रोतस्विनीच्या तीरीं दिवसभर मी तिच्याबरोबर फिरलों आहे. नदीकांठच्या उतारावरील अपरंपार, सुस्निग्ध, कोमल, तृणराशि स्वेच्छेनें पोटभर खाऊन आळसानें भारावलेल्या शरीरानें ती या तरुतळीं येई आणि सर्व वेळ तृणासनावर पहुडून धीरे धीरे रवंथ करी. मधून-मधून आपल्या विशाल नयनांतील कृतज्ञतेनें भरलेली शांत नजर माझ्यावर पसरवून, अत्यंत स्नेहपूर्ण नेत्रांनीं जणूं ती माझें शरीर चाटीत असे ! तिची ती स्निग्ध, अचंचल दृष्टि आणि चकचकीत व तुळतुळीत परिपुष्ट शुभ्र तनु मी कदापि विसरणार नाहीं.

**देवयानी :** तसेंच कलरव करणाऱ्या आपल्या स्रोतस्विनी वेणुमतीची आठवण ठेव.

**कचः** तिलाहि मी विसरणार नाहीं. ही वेणुमती कित्येक कुसुमित कुंजांमधून मधुकंठानें आनंदित कलगान गात, ग्रामवधूप्रमाणें शुश्रूषा करीत, नेहमीं क्षिप्रगतीनें धांवत असते. ती नित्यशुभव्रता विदेश-वासांतील माझी संगिनी होती.

**देवयानी :** हाय, मित्रा ! या विजनवासांत आणलीहि कोणी एक सहचरी तुझ्या सन्निध होती. तुझें परगृहवासाचें दुःख विसरविण्यासाठीं तिचा रात्रं-दिवस मनापासून यत्न चाललेला असे. . .हाय रे दुराशा !

**कच :** तिचें नांव माझ्या साऱ्या चिर-जीवनाशीं कायमचें ग्रथित झालेलें आहे.

**देवयानी :** तुला आठवतें ? — ज्या दिवशीं तूं किशोर ब्राह्मणरूपानें प्रथम येथें आलास तेव्हां तुझें गौरवर्ण शरीर तरुण अरुणाप्रमाणें स्निग्ध व तेजःपुंज होतें. तुझ्या भालीं चंदन चर्चिलेलें होतें. गळ्यांत पुष्पमाला होती. तूं रेशमी वस्त्र नेसला होतास. तुझ्या अधरावर व नयनांत प्रसन्न, सरल हास्य खेळत होतें. —तेथें पुष्पवनांत येऊन उभा राहिलास.

**कच :** त्या वेळीं तूं नुकतेंच स्नान करून, भिज-लेल्या लांबसडक केसांनिशीं, नवीन शुभ्र वस्त्र परिधान करून, ज्योतिःस्नात मूर्तिमंत उषेप्रमाणें, हातांत परडी घेऊन एकटीच पूजेसाठीं ताजीं फुलें खुडीत होतीस. मी विनंति करून म्हणालों, "तुला श्रम शोभत नाहींत. देवि, मला अनुमति दे. मी फुलें काढून देतों."

**देवयानी :** त्याच क्षणीं विस्मयानें मी तुझा परिचय विचारला. तूं विनयानें म्हणालास, "मी बृहस्पतिसुत – तुझ्या पित्याचा शिष्य होण्यासाठीं तुझ्या दारीं आलों आहे."

**कच :** न जाणों, दानवांचे गुरु स्वर्गीच्या ब्राह्मणाला

परतवून लावतील, अशी शंका माझ्या मनांत होती.

**देवयानी :** मी त्यांच्याकडे गेल्यें आणि हंसून म्हणाल्यें, " पिताजी, तुमच्या चरणाशीं एक मागणी आहे. " प्रेमानें जवळ बसवून, माझ्या शिरावर हात ठेवून शान्त मृदु भाषेंत ते म्हणाले, " तुला अदेय असें कांहीं नाहीं. " मीं म्हटलें, " बृहस्पतिपुत्र तुमच्या दारीं आला आहे. त्याला तुम्ही शिष्य करून घ्यावें, अशी विनंति आहे. " त्या गोष्टीला आज कितीतरी काळ लोटला तरीपण तो दिवस म्हणजे आजचीच सकाळ आहे असें वाटतें !

**कच :** दैत्यगणांनीं द्वेषानें तीन वेळां माझा वध केला होता. देवि, तूं दया करून माझे प्राण परत मिळवून दिलेस. ती गोष्ट माझ्या हृदयांत चिरकृतज्ञता जागृत ठेवील.

**देवयानी :** कृतज्ञता ! – विसरून जा ! त्याचें कांहीं दुःख नाहीं. जो उपकार मी केला असेल, त्याची राख होऊन जाऊं दे ! — मला दान-प्रतिदान नको. तुझ्या मनांत कांहीं सुखस्मृति नाहीं काय ? जर एखाद्या दिवशीं अंतरांत ( आंत ) अथवा बाहेर आनंदाचें गीत वाजलें असेल, जर एखाद्या संध्यासमयीं अध्ययनांतून सवड मिळाल्यावर वेणुमतीच्या तीरावरील पुष्पवनांत बसल्या-बसल्या तुझ्या मनांत अपूर्व पुलक जागृत झाले असतील, जर कधींकाळीं पुष्पित निकुंजांतील फुलांच्या सौरभाप्रमाणें तुझ्या हृदयोच्छ्वासांनीं सायाह्न आकाश व्याप्त करून टाकलें असेल– तर तेवढी ती सुखकथा मनांत ठेव !...दूर राहो ती कृतज्ञता ! सख्या, कधींकाळीं येथें जर कोणीं गाणें गात राहिलें असेल आणि त्यानें तुझ्या हृदयाला सुख दिलें असेल, जर एखाद्या दिवशीं असें वस्त्र परिधान करण्यांत आलें असेल कीं, जें पाहून तुझ्या मनांत प्रशंसेची वाणी जागृत झाली असेल आणि 'आज ही किती सुंदर दिसते !' असें तृप्त नेत्रांनीं आणि प्रसन्न अंतःकरणानें तूं मनाशीं म्हणाला असशील, तर ह्या गोष्टी त्या तुझ्या सुखस्वर्ग-धामीं, फुरसतीच्या क्षणीं तूं आठव. कितीदां तरी या वनांत दिक्-दिगंतरीं, आषाढाच्या जणूं नील जटाच असे वर्षाऋतूंतील श्यामस्निग्ध नवघनांचे समुदाय, रिक्त झाले आहेत ! कितीदां तरी अविरल जलवृष्टीच्या वेळीं कर्महीन दिनीं सघनकल्पनांच्या भारानें हृदय पीडित झालें आहे ! कितीदां तरी वसंताच्या बाधाबंधनहीन उल्हासाचे झोंके घेणारा यौवन-उत्साह अचानक आला आहे, आणि त्यानें आपल्या संगीत-मुखर अशा आवेगप्रवाहानें वनवनांतरांत, लतांतून, पल्लवांतून, पुष्पांतून, लहरींवर लहरी उसळवून आनंदाचे पूर वाहविले आहेत, एकवार आठवण करून पाहा तरी ! या वनांत कित्येक उषा, कित्येक ज्योत्स्ना, कित्येक अमावास्येच्या अंधकारमय पुष्पगंधघन रात्री, तुझ्या जीवनांतील सुखदुःखांत मिसळून गेल्या आहेत. त्या सर्वांमधून अशी एखादी प्रभात, अशी एखादी संध्याकाळ, अशी एखादी मुग्ध रात्र, असा एखादा हृदयाचा खेळ, असें एखादें सुख तूं अनुभविलें नाहींस काय, असें एखादें मुख तुझ्या दृष्टीस पडलें नाहीं काय कीं, जें तुझ्या मनांत चित्र-रेखेप्रमाणें चिरकाल कायमचें अंकित होवून राहील ? केवळ उपकार ! शोभा नाहीं ! प्रीति नाहीं ! आणखी कांहीं कांहीं नाहीं ! !

**कच :** सखे, आणखी जे कांहीं आहे तें प्रकट होण्यासारखें नाहीं. हृदयामध्यें, मर्माममर्मांमधून जी वस्तू रक्त बनून वाहात आहे ती बाहेर कशी दाख-विणार ?

**देवयानी :** सख्या, मला माहीत आहे सगळं. माझ्या हृदयाच्या प्रकाशांत, जणूं एका नेत्रपातांत, एका निमेषांत अकस्मात् मी तुझें हृदय कितीदां तरी पाहिलें आहे ! म्हणूनच तर आज रमणीची ही असली धृष्टता ! तर मग थांब ना, थांब. जाऊं नकोस. यशाच्या गौर-वांत सुख नाहीं. येथें वेणुमतीच्या तीरीं आपण दोघे-जण निखिल जगाला विसरून जाऊन आपलीं निभृत, विश्रब्ध, मुग्ध हृदयें या निर्जन वनच्छायेशीं मिसळून अभिनव स्वर्ग रचूं या. अरे मित्रा, तुझ्या मनांतील तें रहस्य मला कळलें आहे.

**कच :** नाहीं ! नाहीं ! देवयानी !

**देवयानी :** नाहीं ? काय ही मिथ्या वंचना ! मी काय तुझें मन पाहिलें नाहीं ? प्रेम अन्तर्यामीं असतें, हें काय तूं जाणीत नाहींस ? विकसित पुष्प हें पल्लवांत झांकलेलें असतें. पण त्याचा गंध लपणार कोठें ? कित्येकदां तूं आपलें मुख वर करून मजकडे पाहतां-क्षणींच, माझा कंठध्वनि ऐकतांक्षणींच, हिरा हलतां-क्षणींच जसा त्याचा प्रकाश सर्वत्र पसरतो त्याप्रमाणें

तुझ्या सर्वांगांतून तुझें हृदय थरारून उठलें आहे— तें काय मीं पाहिलें नाहीं ? मित्रा, तूं सांपडला आहेस. तूं माझा बंदी आहेस. हें बंधन तूं तोडूं शकणार नाहींस. इंद्र यापुढें तुझा इंद्र नाहीं !

**कच :** शुचिस्मिते, हजार वर्षेंपर्यंत या दैत्यपुरींत याचसाठीं मीं साधना केली काय ?

**देवयानी :** कां नाहीं ? या जगांत लोक फक्त विद्येसाठींच दुःख सोसतात काय ? रमणीसाठीं कोणींच पुरुषानें महातप केलें नाहीं काय ? त्या संवरणानें पत्नीचा वर मागण्यासाठीं, तपतीच्या आशेनें आकाशांतील प्रखर सूर्याकडे टक लावून अनाहारयुक्त केवढी कठोर साधना केली नाहीं काय ? हाय ! फक्त विद्याच दुर्लभ ! आणि प्रेम काय येथें इतकें सुलभ असतें होय ? सहस्त्र वर्षेंपर्यंत कोणत्या धनासाठीं तूं साधना केलीस ते तुझें तुलाच माहीत नाहीं ? एका बाजूला विद्या, दुसऱ्या बाजूला मी— ! अत्यंत उत्सुकतेनें कधीं माझी आणि कधीं विद्येची अभिलाषा तूं धरलीस. तुझ्या अनिश्चित मनानें दोघींचेंहि गुप्तपणें यत्नपूर्वक आराधन केलें आहे. आज आम्ही दोघीहि एकाच दिवशीं स्वीकारासाठीं आलों आहोंत. सख्या, जी हवी असेल तिची निवड कर. सरळ साहस करून जर असें म्हणशील कीं, 'विद्येंत कांहीं सुख नाहीं, यशांत सुख नाहीं; देवयानी, तूं केवळ मूर्तिमंत सिद्धि आहेस, तुलाच मी वरिलें आहे.' तर त्यांत कांहीं क्षति नाहीं, कसलीहि लज्जा नाहीं ! सख्या, रमणीचें मन हजार वर्षांच्याच साधनेचें धन आहे !

**कच :** शुभे, देवांसमक्ष मी पण केला होता— कीं महासंजीवनी विद्या मिळवून देवलोकीं परत येईन. त्याचसाठीं मी आलों होतों. तो पण माझ्या मनांत सदैव जागृत राहिला आहे. ती माझी प्रतिज्ञा आतां पूर्ण झाली आहे. इतक्या काळानें हें जीवन कृतार्थ झालें. कुठल्याहि स्वार्थाची कामना मी आज करीत नाहीं.

**देवयानी :** धिक्, मिथ्याभाषी ! फक्त विद्येचीच अभिलाषा धरलीस काय ? गुरुगृहीं आल्यावर तूं केवळ विद्यार्थी म्हणून एकांतांत शास्त्रग्रंथावर नेत्र खिळवून अहोरात्र अध्ययनांतच मग्न राहिला होतास काय ? काय, इतर सर्व बाबतींत उदासीन होतास ! तर मग अध्ययनशाळा सोडून वनावनांतून फुलांसाठीं कशाला फिरत होतास ? माळा गुंफून सहास्य प्रफुल्ल मुखानें या विद्याहीनेला त्या कां आणून देत होतास ? हेंच का तुझें कठोर व्रत ? हाच का तुझा विद्यार्थ्यासारखा व्यवहार ? प्रभातकाळीं तूं अध्ययनांत गुंग असतांना मी हातांत रिकामी परडी घेऊन तेथें येऊन हंसत उभी राही, तेव्हां दंवबिंदूंनीं भिजलेल्या कुसुमराशीनें माझी पूजा करण्यासाठीं, तूं ग्रंथ बाजूला ठेवून देऊन कां मग उठून येत होतास ? तिसऱ्या प्रहरीं मी झाडांच्या आळयांना पाणी देत असे तेव्हां मी श्रांत झालेली पाहून दया वाटून तूं मला पाणी कां काढून देत होतास ? आपला पाठ टाकून माझ्या मृगशिशूचें पालन तूं कां करीत होतास ? संध्यासमयीं, नदीतीरीं, प्रेमनत नयनांच्या स्निग्धच्छायामय दीर्घ पल्लवांप्रमाणें ( पांपण्याप्रमाणें ) निःशब्दपणें अंधकार जेव्हां खालीं उतरे, तेव्हां स्वर्गांतून जें संगीत तूं शिकून आला होतास तें मला कां एकवीत होतास ? विद्या न्यावयास आला होतास तर मग स्वर्गाच्या चातुरीच्या जाळयांत अडकवून माझें हृदय कां हरण केलेंस ? आतां मला समजलें ! मला वश करून माझ्या पित्याच्या हृदयांत तुला प्रवेश करावयाचा होता. राजदरबारीं एखादा मनोरथ पूर्ण झालेला गरजू माणूस मनाच्या संतोषानें द्वारपाळाच्या हातावर दोनचार मुद्रा देऊन जातो, त्याप्रमाणें आज कृतकार्य झाल्यावर मला थोडी कृतज्ञता देऊन तूं जाणार !

**कच :** हाय अभिमानिनी नारी ! सत्य ऐकल्यानें काय सुख होणार आहे ? धर्माला ठावुक आहे कीं, मी प्रतारणा केली नाहीं. निष्कपट हृदयानें, आनंदपूर्ण अंतःकरणानें, तुझा संतोष साधून, तुझी सेवा मी केली आहे. त्यांत जर मी कांहीं अपराध केला असेल तर त्याची शिक्षा मला विधि देतच आहे. ती गोष्ट सांगूं नये असें मनांत होतें. बोल, ज्यायोगें त्रिभुवनांत कोणाचाहि फायदा नाहीं, जी केवळ माझी एकट्याचीच खाजगी गोष्ट आहे, ती जाणून तुला काय फायदा ? माझें तुजवर प्रेम आहे कीं नाहीं याची आज चर्चा करून काय लाभ ? माझें जें कार्य आहे

१ कुरुवंशांतील संवरण नांवाच्या राजानें सूर्याची कन्या तपती हिच्या प्राप्तीकरितां उग्र तप केलें. ही कथा महाभारतांत ( आदिपर्व, अध्याय १७१–१७३ ) आली आहे.










तें मी साधीन. यापुढें स्वर्ग हा मला स्वर्ग भासणार नसला, माझें मन विद्ध मृगाप्रमाणें दूरदूर वनामध्यें तडफडणार असलें, सर्व कार्यांमध्यें माझ्या या दग्ध प्राणांना चिरतृष्णा चिकटून राहणार असली — तरी त्या सुखशून्य स्वर्गधामांत मला गेलेंच पाहिजे! सर्व देवांना ही संजीवनी विद्या प्रदान करून मी नूतन देवत्व देईन, तेव्हांच माझे प्राण सार्थक होतील! त्यापूर्वी मला माझ्या सुखाचा विचार करतां येणार नाहीं. क्षमा कर, देवयानी, अपराधाची क्षमा कर!

**देवयानी :** माझ्या मनांत कुठली क्षमा? हे ब्राह्मणा, तूं हें नारीचित्त वज्रासमान कठोर बनविलें आहेस. आपल्या कर्तव्याच्या आनंदांत सर्व दुःख-शोक दूर सारून तूं मोठ्या गौरवानें स्वर्गलोकीं निघून जाशील.– पण मला काय काम उरलें आहे? मला कसलें व्रत आहे? माझ्या या प्रतिहत निष्फळ जीवनांत आतां काय उरलें आहे? कसला गौरव राहिला आहे? या वनांत मला निःसंग, एकाकी, लक्ष्यहीन बनून नतशिरानें बसून राहावें लागेल. ज्या दिशेकडे मी दृष्टि फिरवीन तिकडून सहस्र स्मृतींचे निष्ठुर कांटे मला बोंचत राहतील. हृदयाच्या तळाशीं लपलेली अत्यंत क्रूर लज्जा वारंवार दंश करीत राहील. धिक्! धिक्! हे निर्मम पथिका, तूं कोठून आलास? माझ्या जीवनाच्या वनच्छायेंत बसून फुरसतीच्या दोन घटका घालविण्याच्या मिषानें, माझ्या जीवनांतील सुखें फुलांसारखीं खुडून, एका धाग्यांत ओवून, तूं त्यांची माळ बनविलीस. पण जातांना ती माळ तूं आपल्या गळ्यांत घातली नाहींस. उलट परम अवहेलनेनें त्या सूक्ष्म धाग्याचे दोन तुकडे करून, तो तोडून गेलास! या प्राणांचा सारा महिमा धुळीला मिळाला! माझा तुला हाच अभिशाप राहील – ज्या विद्येसाठीं तूं माझी अवहेलना करीत आहेस ती विद्या तुला संपूर्ण वश होणार नाहीं! तूं केवळ तिचा भारवाही होऊन राहशील. तिचा उपभोग घेऊं शकणार नाहींस. इतरांना शिकविशील, पण स्वतः तिचा प्रयोग करूं शकणार नाहींस.

**कच :** मी वर देतों, देवि, तूं सुखी होशील. विपुल गौरवांत सर्वग्लानि विसरून जाशील.

---

### स्व. रवीन्द्रनाथ ठाकुरांच्या 'विदाय अभिशाप' मधील

# तेजस्वी देवयानी व धीरोदात्त कच

वर ज्याचा अनुवाद आला आहे तें रवीन्द्रनाथांचें 'विदाय अभिशाप' हें नाट्यकाव्य महाभारतांतील प्रसिद्ध कच-देवयानीच्या कथेवर आधारलेलें आहे. प्राचीन काळच्या महाभारतांतील या कचोपाख्यान-कर्त्यानें जी ही कचदेवयानीकथा वर्णन केली, त्या कथेंत सहाजिकच त्या प्राचीन काळांतील विशिष्ट सामाजिक परिस्थिति, सामाजिक व वैयक्तिक भावभावना व विचार यांचें प्रतिबिंब पडलेलें असणार हें उघड आहे. उलट पक्षीं, आपल्या आधुनिक काळच्या रवीन्द्रनाथांनीं त्याच कथेच्या पात्रांमध्यें नवीन आशय ओतला असून आपल्या प्रतिभेनें एक नवीनच निर्मिति करून दाखविली आहे.

महाभारताच्या कथेमधील कच-देवयानी हीं त्यावेळीं चाललेल्या देवासुरसंग्रामाच्या महान् द्यूतपटावरील प्याद्यासारखीं आहेत. त्यांना आपलें स्वतंत्र व्यक्तित्व दाखवायला वावच नाहीं. देव-दानवांच्या समाजांत पुरोहित-ब्राह्मणाचें सर्वातिशायी वर्चस्व आहे. ब्राह्मण पुरोहित हा समाजांत सर्वशक्तिमान् समजला गेला आहे. बृहस्पतीच्या पौरोहित्याखालील देवसमाज व शुक्राचार्यांच्या पौरोहित्याखालील दैत्यसमाज या दोघांत



अनुक्रमणिका






ऐश्वर्याकरितां किंवा सत्तेकरितां महान् संघर्ष चालू आहे. शेवटीं हा या दोन पुरोहितांमधील संघर्ष आहे. संजीविनीविद्येच्या प्रभावामुळें शुक्राचार्य व त्याचा दानवसमाज अधिक वरचढ ठरला आहे. बृहस्पति व देवसमाज यांना संजीविनीविद्या येन केन प्रकारेण हस्तगत करून घ्यावयाची आहे. संजीविनीविद्या-संपादनाच्या व्यूहांत वापरावयाचीं कच व देवयानी हीं दोघें साधनें आहेत. देव कचाला असा आदेश देऊन पाठवितात कीं, "शुक्राचार्यांजवळची संजीविनीविद्या हस्तगत करून घेण्याकरितां आधीं त्यांची लाडकी मुलगी देवयानी हिला वश करून घे. ती वश झाली कीं संजीविनी हस्तगत झालीच." त्याप्रमाणें कच शुक्राचार्यांच्या आराधनेबरोबर देवयानीचीहि आराधना करतो. गायन, नर्तन, वादन, पुष्पाहरण, प्रेषण ( सांगितलेलीं कामें करणें ) इत्यादींनीं तो तिचें हृदय जिंकून घेतो. शुक्राचार्यांजवळील संजीविनी कचाला शुक्राचार्यांच्या पोटांत शिरून अवगत करून घ्यावयाची आहे. पण शुक्राचार्यांच्या पोटांत शिरण्याचा मार्ग देवयानीच्या हृदयांतून आहे. दानव असूयेमुळें कचाचा अनेक वेळां वध करतात. पण प्रत्येक वेळेला देवयानी वडिलांना गळ घालून त्याला जिवंत करविते. असुरांच्या अत्याचारी कारवायांमुळें, शेवटीं कचाला खरोखरीं अक्षरशः शुक्राचार्यांच्या पोटांतच शिरावें लागतें ! तेथून त्याला शुक्राचार्य आपला पोटचा गोळा जी देवयानी तिच्या पोटतिडिकीमुळेंच मुक्त करतात. या वेळीं कचाला संजीविनीविद्याप्रदान करणें शुक्राचार्यांना भाग पडतें. इतका दीर्घकालीन स्नेहसंबंध येऊनदेखील महाभारतांतील कच देवयानीवर प्रेम करायला, तिचें पाणिग्रहण करावयाला स्वतंत्र नाहीं. देवयानी त्याला 'गुरुपुत्री' असते. शेवटीं तर तो शुक्राचार्यांच्या उदरांतून बाहेर पडल्यामुळें, ती त्याची आतां साक्षात् सहोदर भगिनी होते ! म्हणून तिचें पाणिग्रहण करणें हें पाप होय असें कच समजतो. देवयानी त्याला "तूं बृहस्पतीचाच मुलगा आहेस. माझ्या प्रीतीचें स्मरण करून माझें पाणिग्रहण कर" असें आवर्जून सांगते. पण कच तिची मागणी आर्षधर्माच्या विरुद्ध, अधर्म्य, ती मानून अव्हेरतो. शेवटीं देवयानी तळतळून "तूं मिळविलेली विद्या सिद्धीला जाणार नाहीं" असा शाप देते. कचाच्या मागेंहि त्याच्या धर्माची पुण्याई उभी आहेच. तोहि तिला शाप देतो : "तूं मला शाप दिलास तो कामानें प्रेरित होऊन, धर्मानें नव्हे. कोणीहि ऋषिपुत्र तुझें पाणिग्रहण करणार नाहीं असा माझाहि तुला शाप आहे. माझी विद्या सफळ होणार नाहीं असें तूं म्हणालीस. पण मला जरी ती विद्या सफळ झाली नाहीं तरी, मी ती ज्याला शिकवीन त्याला तरी ती सफळ होईलच होईल."

वर संक्षेपानें निर्दिष्ट केल्याप्रमाणें, महाभारतांतील कथेंतून कच व देवयानी यांच्या स्वभावाचें जें दर्शन होतें तें एका विशिष्ट सांच्याचें, त्या वेळच्या परिस्थितीनें, संस्कारवलयानें मर्यादित असें आहे. हल्लींच्या काळीं आपण व्यक्तीचें स्वातंत्र्य, विचार-व-आचारस्वातंत्र्य हें एक मोलाचें मूल्य मानतों. प्राचीनकाळीं साधारणपणें समष्टीच्या संस्कारजालांत व्यक्तीचें व्यक्तित्व इतकें आवळून जखडलें जात असें कीं, मानवी मनाचा स्वतंत्र आविष्कार होणें ही गोष्ट विरळाच. कच व देवयानी यांचा एवढा दीर्घकालीन प्रेमसंबंध घडून आला, पण कचाच्या मनांत कोठें भावनांचा कल्लोळ, द्वंद्व दिसून येत नाहीं. एक तर, तो देवकार्याकरितां देवयानीच्या प्रेमाचा उपयोग करून घेणारा एक अट्टल मुत्सद्दी असला पाहिजे. पण ज्याचें वर्णन सदाचार, शम, दम, शील, दाक्षिण्य, माधुर्य या गुणांनीं मंडित असा तपोधन असें केलें आहे, त्याच्यावर बिलंदर मुत्सद्दीपणाचा आरोप करणें अन्याय्य होईल. महाभारतांतील कच हा देवांच्या आदेशाचें कांटेकोर पालन करणारा, ज्याचें व्यक्तिमत्त्व त्या वेळच्या समाजानें शास्त्रपूत मानलेली गुरुभक्ति, परंपरागत पापपुण्यांचें कल्पनाजाल यांत विलीन होऊन गेलें आहे, असा त्या वेळचा कर्तव्यतत्पर युवक होता असें मानणें हेंच सयुक्तिक होईल. तरुण देवयानी कचावर अनुरक्त होऊन त्याला पाणिग्रहण करण्याबद्दल आग्रह करण्याइतकें धीट व्यक्तित्व दाखविते, हें खरें. पण तो तिच्या सहज प्रेरणेचा, 'कामा'चा एक स्फोट म्हणून गणला जातो. तिच्या या धिटाईला त्या वेळच्या सांस्कृतिक चौकटींत स्वतंत्र नैतिक मूल्य नाहीं. महाभारतांतील कच तिला हिणवितोच :, "तूं हें कामुकतेमुळें करीत आहेस, यांत धार्मिकता नाहीं– 'कामतः न धर्मतः'."

महाभारतांतील या कथेच्या पार्श्वभूमीवरून, **रवींद्रनाथांच्या 'विदाय अभिशाप'** या नाट्यकाव्यांत जर प्रवेश केला तर, या आधुनिक कविसम्राटांनीं या जुन्या

कथापात्रांतून किती नवीन आशय ओतला आहे त्याची साक्ष पटते. त्यांच्या प्रतिभेच्या संजीविनीनें देवयानी व कच यांना एक नवें उज्ज्वल व्यक्तिमत्त्व अर्पण केलें आहे. प्रत्येकजण आपापला निर्णय घेतातच. पण त्या प्रत्येकाच्या निर्णयामागें विलक्षण आत्मप्रत्ययसंपन्न व्यक्तिमत्त्व रवीन्द्रनाथांनीं उभें केलें आहे. देवयानीच्या संवेदना व भावना किती सुकुमार, किती सुंदर, किती सुसंस्कृत, किती उत्कृष्ट आहेत ? ती फार मानी आहे; तिचा मानीपणा तिच्या तेजस्वी व्यक्तिमत्त्वाचाच आविष्कार आहे. तिचा हा तेजस्वी मानी स्वभाव प्रस्तुत प्रसंगीं किती शोभून दिसतो ? परंपरागत पुरुषी ध्येयांच्या भाराखालीं तिचें व्यक्तित्व चिरडलें न जातां तें उफाळून, बंड करून उठतें. ज्याला तिनें आपलें प्रेमसर्वस्व अर्पण केलें आहे तोहि तिच्यावर अनुरक्त आहे या जाणीवेमुळें तिला अपरंपार आत्मविश्वास वाटत आहे. 'तुझें हृदय मी जाणतें. तूं माझा बंदी आहेस. इन्द्र तुझा इन्द्र नव्हे मी तुझा इन्द्र' असें ती निक्षून सांगते. "हजार वर्षें तपाची साधना मी मग याकरितांच कां केली ?" असें विचारणाऱ्या कचाला ती न डगमगतां सांगतेः "होय. रमणीचें मन जिंकून घेणें ही काय साधी गोष्ट आहे ? रमणीचें मन हजार वर्षांच्या साधनेचें धन." तिला बरोबरीचें प्रेम पाहिजे आहे. उचनीचतादर्शक, परकीपणाचे नुसते आभार, नुसती कृतज्ञता तिला नको आहे. "राजदरबारीं आपलें काम साधून घेणारा माणूस मोठ्या संभावितपणें द्वारपालाच्या हातावर थोडी चिरीमिरी देऊन आपली कृतज्ञता व्यक्त करतो. तशी तुझी ही कृतज्ञता होय !" – असें ती जी चिडून म्हणते तें किती स्वाभाविक आहे ? दुसऱ्याच्या कार्याकरितां आपण वापरलें गेलों ही जाणीव मानधन व्यक्तित्वसंपन्न माणसाला किती यातनादायक आहे ? आपलें प्रेमसर्वस्व अर्पण करणाऱ्या रमणीचें जीवन, कांहीं ध्येयांच्या आहारीं जाऊन उजाड करणाऱ्या पुरुषांच्या विरुद्ध देवयानीसारख्या जागृत तरुणीच्या मुखांतून बाहेर पडलेला शाप सार्थ आहे, असें वाटण्याइतकें देवयानीचें प्रभावी व्यक्तिमत्त्व रवीन्द्रांनीं रंगविलें आहे.

रवीन्द्रनाथांची देवयानी जशी तेजस्वी तसाच रवीन्द्रनाथांचा प्रस्तुत नाट्यकाव्यांतील कच हा अत्यंत संयमी, प्रशांत, गंभीर आणि धीरोदात्त असा दाखविला आहे जे देवकार्य सामाजिक कर्तव्य म्हणून त्यानें अंगीकारलें आहे, त्याच्या आड येणाऱ्या सर्व भाव-भावनांवर संयम ठेवून स्वार्थी भावनेचा स्पर्श न होऊं देतां तें कर्तव्य कठोर निश्चयानें पार पाडायचें त्यानें ठरविलें आहे. या निरोप घेण्याच्या विशिष्ट प्रसंगीं त्यानें असामान्य संयम धारण केला आहे. त्याच्या मनांत स्नेहाचे व भावनांचे कल्लोळ उठले नसतील असें नाहीं. पण ते प्रकट करायचा हा समय नव्हे, असें ओळखून त्यानें त्या भावनांना अत्यंत संयमानें आवरून धरलें आहे. संयत भावनेनें तो मोजकेंच बोलतो. किंबहुना, या नाट्यकाव्याची खुमारी, देवयानी त्याच्याकडून जी प्रेमाची कबूली काढून घेते यांत आहे. अत्यंत खोल जलाशयाप्रमाणें आपला थांग लागूं न देणारा कच देवयानीच्या माऱ्यापुढें तळापासून ढवळून निघतो. त्यानें खूप स्तब्धतेचें कठोर कवच धारण केलेलें असतें. पण देवयानी आपल्या प्रेमप्रेरित उपरोध, स्पष्टोक्ति, सुखस्मृति इत्यादि सुकुमार प्रहरणांनीं त्या कवचाचा भेद करून कचाच्या अंतरंगाचा ठाव घेते. तो प्रेमाची कबूली देतो ती तरी किती संयत आणि मोजकी ? "माझ्या हृदयांत जी रक्त बनून वहात आहे ती प्रीति बाहेर कशी दाखविणार ?" – या त्याच्या संयमपूर्ण उद्गारांतून त्याच्या अंतःकरणांतील गूढ व्यथा अधिकच प्रतीत होते.

रवीन्द्रनाथांच्या प्रस्तुत काव्यनाट्याचा विशेष हा कीं, त्यांतील भावोत्कटता आरंभापासून शेवटपर्यंत चढत्या कमानींत वाढत जाते. ही भावोत्कटता वाढत वाढत जावून तिचें पर्यवसान शेवटीं देवयानीच्या शापवाणींत व कचाच्या धीरोदात्त वरांत होतें. आरंभापासून चढत जाणारी ही भावोत्कटता अनुभविणाऱ्या वाचकाला हें पर्यवसान म्हणजे भावोत्कटतेची अपरिहार्य स्वाभाविक परिणति वाटून त्याला भावतृप्तीचा काव्यानंद मिळतो. एखाद्या सिद्धहस्त तंतकाराप्रमाणें, कवि हृत्तंतू छेडीत, सूक्ष्म, तरल विविधतापूर्ण भावसंगीताची प्रतीति घडवून आणतो.

देवयानी व कच यांच्या प्रत्येक वाक्यागणिक नवनवीन भावछटा निर्माण होतात व त्यांतून दोघांचें अंतरंग प्रकट होऊं लागतें. निरोप घ्यायचा जीवनांतील अत्यंत दारुण प्रसंग दोघांसमोर उभा ठाकला आहे. देवयानीवर तर हा निर्वाणींचाच प्रसंग आहे. त्याला तोंड देण्याकरितां तिच्या सर्व जीवनशक्ती उभ्या राहिल्या आहेत. तिच्या भावनांना व शब्दांना विलक्षण धार







चढलेली आहे. या ताणलेल्या मनःस्थितींत कचाचा धीरोदात्तपणा तिला संभावितपणाचा, औपचारिक शिष्टाचाराचा बुरखा वाटतो. धीरोदात्तपणाचा आव आणून जेव्हां कच तिला "तूं मला आज प्रसन्न सहास्य वदनानें निरोप द्यायला हवास" असें सांगतो, त्या वेळीं ती उसळून त्याला "हास्य ! हास्य येथें सुलभ नाहीं." असें म्हणून जो पहिलाच फटका मारते तेथून नाट्यमय भावनासंघर्षास प्रारंभ होतो. नंतर देवयानी वनभूमि, स्निग्ध-प्रेमल वटछाया, वत्सल होमधेनु आणि कलगान करणारी वेणुमती इत्यादि ज्या दोघांच्या आश्रमवासांतील सहचरी त्यांची जणूं साक्ष काढते व प्रथमदर्शनापासूनच्या अनेक सुखस्मृती उभ्या करते. या भारावलेल्या भावोत्कट वातावरणांत आपलें प्रेम अप्रकट ठेवणें कचाला अशक्य होतें. देवयानीनें आरंभींच "पहा, एखादी तृणांकुराप्रमाणें क्षुद्र अशी एखादी वांछा हृदयाला बोंचत असेल" असें विचारलें असतांना ज्या कचानें "माझें जीवन आज कृतार्थ, पूर्ण झालें आहे, माझ्या जीवनांत अभाव म्हणून कसला राहिलेला नाहीं" असें उत्तर दिलें होतें, तोच कच शेवटीं म्हणत आहे कीं "विद्ध मृगाप्रमाणें माझें मन कायमचें तडफडत रहाणार, चिरतृष्णा माझ्या प्राणांना कायमची चिकटून रहाणार !"

खरोखरीं आपल्या प्रियकराचें आपल्यावर किती गाढ प्रेम आहे याचें दर्शन होऊन दुसऱ्या एखाद्या रमणीनें कृतार्थता मानली असती. अशा क्षणीं भवभूतीच्या 'उत्तररामचरितां'तील सीतेची आठवण होते. आपण निरपराधी असतांना आपणांस आपल्या प्रियकरानें टाकून द्यावें हें शल्य सीतेच्या हृदयांत सारखें सलत असतें. पण 'उत्तररामचरिता'च्या तिसऱ्या अंकांत रामाच्या हृदयाचा तिला जो साक्षात्कार होतो, त्या योगानें स्वतःच्या परित्यागाचें दुःख ती विसरून जाते. व 'परित्यागशल्यं उद्धृतं आर्यपुत्रेण' अशी ती प्रांजळ कबूली देते.— प्रस्तुत स्थळीं देवयानीलाहि तसें मानावयास हरकत नव्हती. पण मग देवयानी ही देवयानी राहिली नसती ! देवयानी अगदी निराळ्या स्वभावाची रमणी आहे. ती लाडांत वाढलेली आहे. दैत्यांचे गुरु शुक्राचार्य, ज्यांच्या संजीवनीसामर्थ्याला त्रैलोक्य तिन्ही सांजा प्रणाम करतें असें महाभारतांत वर्णन केलें आहे; त्या शुक्राचार्यांची ही देवयानी 'उच्छ्वसितम् इव', साक्षात् जीव कीं प्राण ! शुक्राचार्यांनींच तिला म्हटलें आहे : "तुला अदेय असें कांहीं नाहीं". म्हणून आपला शब्द खालीं पडलेला देवयानीला माहीत नाहीं. आपणांस हवी असलेली गोष्ट मिळालीच पाहिजे, व ती आपली – सर्वतोपरी आपलीच राहिली पाहिजे असा तिचा सर्वंकष स्वामित्व गाजविण्याचा स्वभाव बनला आहे. अशा स्वभावाच्या स्त्रीला आपला प्रियकर आपलें मानीत नाहीं हें कसें सहन होईल ? रवीन्द्रनाथांनीं देवयानीच्या स्वभावाचें हें इंगित ओळखून तिच्या तोंडून तें फार सुंदर व मार्मिक रीतीनें प्रकट केलें आहे. विद्याप्राप्ति किंवा यशोलाभ याच्या बुडाशीं कांहीं सामाजिक कर्तव्याचें पालन गर्भित आहे याची तिला क्षितिच नाहीं. ती सांगते : 'यशाच्या गौरवांत सुख नाहीं. वेणुमतीच्या तीरीं आपण दोघे निखिल जगाला विसरून ('निखिलविस्मृत') आपण एक अभिनव स्वर्ग रचूं या." आपला प्रियकर केवळ आपल्या, आपल्याच भोंवतींच राहिला पाहिजे इतकी ती आत्मकेन्द्रित आहे. म्हणून कच—मग त्याचें कोणतेंहि समर्थनीय कारण असेना का-तिला सोडून जावयास निघाला आहे यामुळें तिचा अहंकार भयंकर दुखावतो. म्हणून ती तळतळून उद्गार काढते : "नारीचित्त तूं वज्रासमान कठोर बनविलें आहेस... माझ्या या प्रतिहत निष्फळ जीवनांत आतां काय उरलें आहे ?... ज्या दिशेकडे दृष्टि फिरवीन तिकडून सहस्र स्मृतींचे निष्ठुर कांटे मला बोंचत रहातील. हृदयाच्या तळाशीं लपलेली अत्यंत क्रूर लज्जा वारंवार दंश करीत राहील !"—या भयंकर मानहानीनें ती अत्यंत व्यथित झाली असतां तिच्या तोंडून शापवाणी निघाली नाहीं तरच नवल ! म्हणून तिचा शाप तिच्या स्वभावानुसार अपरिहार्य परिणति वाटते. रवीन्द्रनाथांच्या कचानें देवयानीचा हा स्वभाव ओळखलेला आहे, असें दिसतें. महाभारतांतला कच देवयानीला उलट शाप देतो. पण रवींद्रनाथांचा कच तसा उलट शाप देत नाहीं. या रमणीच्या शापवाणीमागील नारीहृदयाचें प्रेमवैभव व गौरव त्याला प्रतीत होत असतें. म्हणून तो धीरोदात्तपणें व शान्तपणें हे सगळे आघात सहन करतो. सामाजिक कर्तव्य कीं प्रेम या द्वंद्वांत सामाजिक कर्तव्य पतकरीत असतांना प्रेमापराधाबद्दल विधि जी शिक्षा करील ती शांतपणें सहन करण्याचें तो ठरवतो व तिच्या शापवाणीला धीरोदात्त मोजकेंच उत्तर देतोः "देवि, मी तुला वर देतों. देवि, तूं सुखी होशील.










विपुल गौरवांत सर्व ग्लानि विसरून जाशील''.–रवीन्द्रनाथांनीं चित्रिलेल्या स्वभावविशेषांचा हा परिपोष व परिणति बघून, वाचकाला निरतिशय काव्यानंदाची तृप्ति अनुभवायला मिळते. रवीन्द्रनाथांच्या असामान्य प्रतिभेनें आपल्या संजीविनीसामर्थ्यानें या जुन्या कच-देवयानी-कथानकांतून किती सुंदर नवनिर्मिति करून दाखविली आहे, याचें कौतुक वाटतें.

रवीन्द्रनाथांवर पौरस्त्य व पाश्चात्त्य उत्कृष्ट कविश्रेष्ठांच्या कृतींचे संस्कार झाले आहेत. ते सर्व संस्कार आत्मसात् करून त्यांच्या प्रतिभेनें एक नव साहित्यविश्व निर्माण केलें आहे. त्यांच्या साहित्याचा आस्वाद घेतांना, त्या विविध संस्कारांचे पडसाद उमटलेले बघून विलक्षण आनंद होतो. अशा कविश्रेष्ठांपैकीं कालिदास हा रवीन्द्रनाथांचा किती आवडता होता हें कालिदास व त्याचे ग्रंथ ह्यासंबंधीं त्यांनीं ज्या कित्येक सुंदर कविता लिहिल्या आहेत त्यांवरून दिसून येतें. त्यांच्या शैलीनें कालिदासाच्या शैलीचे मधुर गुण आत्मसात् केले आहेत. प्रस्तुत 'विदाय अभिशाप' वाचतांनाहि कालिदासाच्या ग्रंथांतील कित्येक स्थळांची, त्याच्या शैलीची आठवण होते व त्यामुळें नाट्यकाव्याचा आस्वाद घेत असतां कालिदासाच्या शैलीचा मधुर परिमळ दरवळतांना पाहून मन अत्यंत प्रसन्न होतें.

– वि. म. वेडेकर

---

## मज नको दुजें कांहीं — !

मज नको दुजें कांहीं
फक्त हवी माझी व्यथा
दिगंतरीं भटकाया
हवी फक्त व्यथाकथा !

कधीं मज वाटे व्हावें
कृत्तिकेचा गर्भ सान
चंद्रिकेच्या हिंदोळ्यांत
पहुडावें विवशून.

जोजवाया वायुवीचि
खुळखुळा इंद्रधनु
तारकांच्या कुचांतील
प्यावें तेजाचेंच स्तन्य !

विवशून पहुडावें
धरणीच्या अंकावर
डोहळांनीं आणि गावा
अंगाईचा गीतस्वर

मज हव्या मृगसरी
घालावया न्हाऊं माखूं
तीट लावावया आर्द्रा
येई म्हणे 'आकू आकू' –!

कधी मज वाटे हवी
उन्मनीची परा वाचा
मतलबी दुनियेची
पुरे क्षुद्र परवचा !

आणि वाटे जावें कधीं
अनंताच्या दारीं दूर
मूकपणें कथावया
अंतरींची हुरहूर !

आस आहे प्यास आहे
प्याया परी नाही ओठ
वाट आहे अमृताची
पायांचेंच होई पीठ !

पहुडतों विवशून
धरणीच्या अंकावर
कासावीस नयनांनीं
आशू बघतों अंबर

तृषितच उठतांना
दैवहीन हातीं येती
चारदोन तृणपातीं
चारदोन तृणपातीं !

अशी दिव्य माझी व्यथा
सर्वें हवी सदा हातीं
दिगंतरीं भटकाया
व्यथेचीच ह्याच काठी !

दिगंतरीं भटकाया
नको मज दुजें कांहीं
व्यथेचीच कथा ह्याच
सदा माझ्या ओठीं हवी !

—– मधु वाबगांवकर

प्रा. व. म. परांजपे

# स्टीफन स्पेंडर

विसाव्या शतकाच्या प्रथमार्धात, इंग्लिश जीवनाला बसलेले हेलकावे जेवढ प्रचंड, तेवढेच सर्वव्यापी होते. या आघातांचें स्वरूप कमालीचें विरोधपूर्ण आहे. मुळापासून सबंध संसारवृक्ष उन्मळून पडतो कीं काय, अशा भीतीनें थरकांप झालेलीं इंग्लिश मनें, कांहीं कालानंतर, पुनः एकदां नव्या सर्जनाच्या आशेनें प्रफुल्ल झालेलीं दिसतात. वैभवशाली व्हिक्टोरिअन कालांत उभारलेले मनोरे, पहिल्या महायुद्धाच्या झंझावातानें, पत्त्यांच्या बंगल्याप्रमाणें उधळले गेले. स्वप्नसृष्टींत विहार करणाऱ्या मनावर या युद्धानें ओढलेल्या आसूडाचा प्रहार इतका परिणामकारक ठरला कीं क्षणभर सारेंच आयुष्य 'ओसाड रानमाळा'प्रमाणें वांझोटें भासूं लागलें! आपण सर्व माणसें 'बुजगावण्यां'-प्रमाणें अंतर्बाह्य संज्ञाशून्य आहोंत, हा साक्षात्कार झाला. वडिलार्जित इस्टेट, घराण्याचा मोठेपणा, बापजाद्यांची कमाई या सर्वांतील व्यर्थपणा भुतासारखा मानगुटीं बसला. परंतु पुनः थोड्याच काळांत मृगाची सर येऊन नव्या जीवनाचे कोम्ब वर डोकावूं लागले. तरणीबांड मनें हरखून गेलीं. अनुभवाच्या उन्हाळ्यानें करपून गेलेलीं म्हातारीं मनेंहि 'लीग ऑफ् नेशन्स'च्या अभिनव कल्पनेनें उल्हसित झालीं. युद्धाचें भीषण हत्याकांड इतिहासजमा झालें, त्याची आवृत्ति आतां पुनः होणार नाहीं अशी आशा वाटूं लागली. सोव्हिएट रशियांतील नवसंस्कृतीमुळें, बंडखोर तरुण रक्ताला आवाहन मिळालें. भोंवतालच्या निबिड अंधकारांतून समता, शांति व प्रगति यांचा सुस्पष्ट मार्ग दाखविणाऱ्या कम्युनिझमनें नव्या पिढीवर अद्भुत मोहिनी टाकली. जादूची कांडी फिरून सर्व प्रश्न चुटकीसरसे सुटावेत, मनांतील तिमिर नाहींसें व्हावें आणि शाश्वत शांतीच्या मंगल मंत्रांनीं वातावरण निनादून जावें, या सगळ्या अशक्य वाटणाऱ्या नवलकथा प्रत्यक्ष आटोक्यांत आल्या अशी जणूं खात्री पटली. पुनः ५-१० वर्षे गेलीं. रशियांतून येणारीं वृत्तें मनें विचलित करणारीं ठरूं लागलीं. सामूहिक शेतीच्या प्रयोगानिमित्त घडलेला भयानक संहार, क्रांतीचे एकेकाळचे निष्ठावंत पाठीराखे म्हणून ओळखले गेलेले नव्या राजवटींत सूर्याजी पिसाळ ठरले गेले! – त्यांच्यावरील खटले, त्यांनीं दिलेले कबुलीजबाब – एकूण लक्षणें ठीक दिसत नव्हतीं. परंतु स्पॅनिश यादवीनें वातावरणांत आकस्मिक बदल झाला आणि पुनः एकदां कम्युनिस्ट तत्त्वप्रणाली प्रभावशाली बनूं लागली. पण या युद्धाचे अनुभव कांहीं आगळेच ठरले. आणि सरतेशेवटीं ज्याला आपण देव म्हणून पूजिलें, त्यांचें खरें स्वरूप कांहीं निराळेंच असल्याची दुःखद कबूली द्यावी लागली. दुसरें युद्ध आलें. पहिल्या युद्धाच्या मानानें याची भयानकता आणखीच उग्र ठरली. फॅसिझमचा सर्वभक्षक दैत्य नवसंस्कृतीचीं पाळेंमुळें खणून काढणार अशी भीति मनाला ग्रासूं लागली. गेल्या अनेक वर्षांत परक्या शत्रूचा पाय न लागलेली इंग्लिश भूमि बॉंबहल्ल्यानें उध्वस्त झाली. युद्ध जरी संपलें तरी मागें निराशा, दुःख, भूक, गरीबी, या भुतांचा नंगा नाच चालूंच राहिला. यांतूनच पुनः एकदां नव्या जगाची उभारणी – पुनश्च हरिः ॐ !

ही प्रचंड उलथापालथ केवळ बाह्य जीवनांत घडली असती, तर तिचा परिणाम क्षणैक ठरला असता. परंतु इतर अनेक दृष्टींनीं हीं पन्नास वर्षें फार महत्त्वाचीं ठरलीं. विज्ञानांत आणि तत्त्वज्ञानांत आमूलाग्र नवें संशोधन होऊन, विस्तार व खोली या दोन्ही दृष्टींनीं एवढी प्रगति झाली कीं जीवनाची पुनः एकदां संकलित नवी समीक्षा करणें भाग होतें. पदार्थविज्ञानक्षेत्रांतील 'क्वान्टम थिअरी' वा 'थिअरी ऑफ रिलेटिव्हिटी' जेवढ्या क्रांतिकारक ठरल्या, त्यापेक्षांहि फ्राइड, युंग आणि ॲड्लर यांचें मानसमंथन अधिक परिणामकारक ठरलें. मानवी मनाचे अज्ञात कंगोरे प्रकाशांत आले; आणि माणसाच्या एरवीं साध्यासुध्या वाटणाऱ्या कृतींतहि फार गूढ अर्थ भरला असल्याची जाणीव झाली. जगाचें स्वरूप इतक्या झपाट्यानें पालटत जाऊं लागलें कीं साध्यासुध्या माणसालाच काय, पण मोठमोठ्या विद्वानांनाहि प्रगतीचा हा भरमसाट वेग सहन होणें शक्य नव्हतें. प्राचीन काळीं, एका युगाची व्याप्ति साधारणपणें कमींतकमी एका शतकाइतकी असे. या नव्या जमान्यांत दर १० वर्षांनीं नवें युग अवतरूं लागलें. या कालाकडे ओझरता दृष्टिक्षेप केल्यास, जुन्या मूल्यांना घट्ट चिकटून बसणारा सनातनवाद, विवस्त्रतेचे गोडवे गाणारा नग्नतापंथ,



अनुक्रमणिका








लिबरॅलिझम, कम्युनिझम, लष्करी हुकूमशाही, अनियंत्रित स्वातंत्र्य, हिंसा, वेदान्त, साधनशुचिता, अंतिम यश हेंच एकमेव मूल्य मानणारी विचारसरणी, एक्स्प्रेशनिझम्, इम्प्रेशनिझम्, ट्रॅडिशनॅलिझम्, व्हर्सलिब्रिझम् (Vers–librism) इत्यादि इझम्, हें सर्व कांहीं मानणारे, सर्व कांहीं झुगारून देणारे, असा एकच कोलाहल माजलेला दिसतो. "It was the best of times, it was the worst of times" या शब्दांत डिकन्सनें केलेलें वर्णन, या कालाला बरोबर लागूं पडतें.

**समकालीनांचा प्रभाव**

नवनिर्मिति आणि विनाश यांच्या विरोधी ताणांनीं घुसळल्या जाणाऱ्या या प्रलयंकर आणि शुभंकर काळांतला श्री. स्पेंडर यांचा जन्म आहे. वर वर्णिलेल्या पार्श्वभूमीशिवाय त्यांच्या मनाची घडण व काव्याचें स्वरूप नीट आकलन होणें कठीण जाईल. नव्या विचारांचे प्रतिनिधि असलेले डब्ल्यू. एच्. ऑडेन व इशरवुड या लेखकांशीं त्यांचा परिचय विद्यार्थिदशेंतच झाला. या दोघांच्या विचारांचा व शैलीचा परिणाम श्री. स्पेंडर यांच्यावर कितीसा झाला आहे, हें अजमावणें कठीण आहे. त्यांच्या परिचयाचा इतिहास मात्र त्यांच्या मनःप्रवृत्ती समजण्याच्या दृष्टीनें उद्बोधक ठरेल. सुरवातीला तर ऑडेनच्याच दृष्टींतून जगाकडे ते पहात होते, असें म्हटल्यास वावगें होणार नाहीं. प्रथमदर्शनींच ऑडेननें त्यांच्यावर आपली छाप बसविली. तसें पाहिलें तर ऑक्सफर्ड-विद्यापीठांत ऑडेन फक्त २ – ३ वर्षांनीं स्पेंडर यांच्या पुढें होते. परंतु, एखाद्या नवशिक्या शिष्यानें चांचरत, मस्तक विनम्र करून गुरुसन्निध जावें व गुरुमुखांतून पडेल तो शब्द अधीरपणानें हृदयांत खोल सांठवून त्याचीच भक्तिभावानें पूजा बांधावी, — येवढी श्रद्धा ऑडेनबद्दल स्पेंडर बाळगीत होते. ऑडेनची भेट होणेंच आधी किती मुष्किल ! त्यांच्याशीं ओळख असणारे विद्यार्थी, उगीच आपल्यांत कोणी आणखी भागीदार नको, या वृत्तीनें स्पेंडरची ऑडेनशीं ओळख करून देण्यासहि तयार नव्हते. पहिली भेट झाली, ती एका खाण्याच्या प्रसंगीं. दृष्टि अधू असणाऱ्या माणसाप्रमाणें बारीक डोळे करून ऑडेननीं स्पेंडरना एकदां नखशिखान्त न्याहाळलें. मात्र हें करीत असतांना तोंडांतून एक चकारशब्दहि नाहीं. कॉफीपानाच्या वेळीं, एकदमच आठवण झाल्याप्रमाणें, त्यांनीं मान वर केली आणि प्रश्न टाकला : "आधुनिक कवींपैकीं कोणाचें काव्य जास्ती आवडतें तुम्हांला ?" भीतभीतच स्पेंडरनीं उत्तर दिलें, "'W – ' यांची कविता उत्तम आहे, मला वाटतें ". "त्या गाढवाच्या पेंकाटांत लाथ मारण्याच्या लायकीचा आहे तो शुंभ !"

परंतु परत जातांना गुरुमाऊलीनें अनुग्रह केला. आपल्या मठींत येण्याचें स्पेंडरना निमंत्रण दिलें. यानंतर काव्य म्हणजे काय, तें कसें लिहितात, याबद्दलचीं बौद्धिकें सुरूं झालीं. "कवितेचा विषय म्हणजे फक्त काव्याचें सोवळें टांगून ठेवण्याची खुंटी असते" येथपासून, तें "How often do you write poetry ?" असे प्रश्नहि विचारले जात. या प्रश्नाला स्पेंडरनीं उत्तर दिलें : "साधारण रोज चार कविता पडतात माझ्या ". "अबब, भलताच दम आहे बुवा तुमचा !". 'आपण ?" स्पेंडरनीं उलट प्रश्न केला. "मी, साधारण तीन आठवड्यांतून एखादी कविता लिहितों. " तेव्हांपासून स्पेंडरनींहि तीन आठवड्यांत एकच कविता करण्याचा पायंडा पाडला !

ऑडेनसाहेबांचेंहि एक आराध्यदैवत होतेंच ! स्पेंडरनाहि मागें टाकील अशा मनोभावें त्यांनीं क्रिस्टोफर इशरवुडची भक्ति आरंभिली होती. इशरवुडच्या पसंतीला न उतरलेल्या कवितेला केराची टोपली दाखविली जाई. अख्ख्या कवितेंतील एखाद्याच ओळीवर पसंतीचा शिक्कामोर्तब बसला, तर मोठ्या कौशल्यानें तेवढीच ओळ एखाद्या नवीन केलेल्या कवितेंत ऑडेन घुसडून देत. ऑडेनच्या मित्रांनीं जितक्या कसोशीनें स्पेंडरशीं त्यांची गांठभेट पडूं दिली नव्हती, तितक्याच काळजीपूर्वक ऑडेननींहि मैत्री राखण्याचा आपला खास अधिकार राखून ठेवला होता. पहिली मुलाखत झाली तें दृश्यहि वरीलप्रमाणेंच होतें. ऑडेनच्या कवितेंतील एका ओळीवर इशरवुडनीं आक्षेप घेतला. "काय ही चूक !" या विचारानें अधोमुख झालेल्या ऑडेननीं घाईघाईनें ती ओळ खोडून टाकली ! भक्तीची हीच प्रथा पुढें स्पेंडरनींहि इशरवुडच्या बाबतींत चालूं केली. आपल्या जर्मनींतल्या वास्तव्यांत, इशरवुड जणूं स्पेंडरचें सारसर्वस्व झाले होते. त्यांच्यासाठीं आपल्या जेवण्याचे हाल करूनहि,



अनुक्रमणिका

इशरवुड खाना खात त्या एका दरिद्री हॉटेलमध्यें स्पेंडरहि त्यांचेबरोबर जात असत.

या देवाचा महादेव ( Chalmers ) चामर्झ ! त्यांनीं आपली कम्युनिस्ट विचारसरणी स्पेंडर यांच्या गळीं उतरविण्याचा आटोकाट प्रयत्न केला.

### काव्यप्रकृतीचें वैशिष्ट्य

वरील मजकुरावरून कोणाचीही सहज अशी अपेक्षा होईल कीं ऑडेन, इशरवुड व चामर्झ यांचा स्पेंडरच्या व्यक्तिमत्त्वावरील व काव्यावरील ठसा फारच सुस्पष्ट असला पाहिजे. वास्तविक असें असावयास कांहींच प्रत्यवाय नव्हता. परंतु श्री. स्पेंडर यांच्या मनाची घडणच मोठी वैशिष्ट्यपूर्ण आहे. एखाद्याच्या मोठेपणानें प्रथमदर्शनीं पुरतें वाहून जाणें, त्याची अनन्यसाधारण भक्ति आरंभिणें – हें त्यांच्या व्यक्तिमत्त्वाचें एक प्रमुख अंग आहे. परंतु लवकरच पहिला पूर ओसरतो. डोळ्यांवरील केवळ आदराचें पटल दूर होतें. अंतर्मनांतील टीकाकार जागा होतो. पूर्वी न लक्षांत आलेले दोष जाणवूं लागतात. शिकवणींतील खरा ग्राह्यांश किती हें ठरवितां येतें. निश्चयानें भाबडी भक्ति दूर सारून, आपणांस जें पटतें आणि जें मानवतें तेवढेंच टिपून घेऊन, हा विहंग दुसरीकडे भरारी मारतो. कोणत्याहि परस्थ व्यक्तीशीं, भावनेशीं वा विचाराशीं समरस होत असतां, आपली चिकित्सक बुद्धि जागृत ठेवून, विचक्षणापूर्वक त्याचें रसग्रहण करण्याची, श्री. स्पेंडर यांची ही वृत्ति, त्यांच्या काव्यप्रकृतीचें प्रधान वैशिष्ट्य म्हणून सांगतां येईल.

चामर्झनीं साम्यवादाचे एकामागून एक डोस पाजले. भांडवलदार व फॅसिस्ट राष्ट्रांनीं चालविलेल्या रशियाच्या पद्धतशीर गळचेपीचें आवेशपूर्ण वर्णन त्यांनीं केलें आणि मग केवळ एकच एक जबाब मिळूं शकेल, असा बिनतोड सवाल केला: "इंग्लिश व व अमेरिकन भांडवलवादानें पोसलेल्या या युद्धपिपासु जर्मन राष्ट्रवादामुळें, युरोपवर आणि प्रायः रशियावर ओढवणाऱ्या भयानक आपत्तीवर उपाय काय?"

स्पेंडर लिहितात : "चांचरतच मी उत्तर दिलें : 'सामाजिक न्याया-( Social Justice )ची आवश्यकता मला पटली आहे. युद्धाचा मला मनस्वी तिटकारा आहे.–पण मात्र या आगींतून सुटका करून घेण्यासाठीं, आपलें स्वातंत्र्य आपण गमवावें, हिंसक व क्रांतिकारी पद्धतींचा अवलंब करून, हुकूमशाहीच्या फुफाट्यांत पडावें, हें मला पटत नाहीं.' इतका वेळ शांतपणानें ऐकून घेणारे चामर्झ एकदां स्वतःशींच हंसले, आणि माझें बोलणें संपल्यावर शांतपणें उद्गारले, 'हं, अगदींच गांधी!'"

स्पेंडर यांच्या व्यक्तिमत्त्वाचें दर्शन घडविणारा हा प्रसंग मोठा सूचक आहे. स्पॅनिश यादवींत स्पेंडर यांची सहानुभूति सर्वस्वीं लोकशाहीवाद्यांकडेच झुकली होती. परंतु तरीहि त्यासंबंधींच्या त्यांच्या काव्यांत पुरेपुर जोष भरलेला नाहीं, क्रांतीचे पडघम हव्या तेवढ्या गगनभेदी उच्च स्वरांत वाजत नाहींत, अशी तक्रार केली गेली. त्या तक्रारीला स्पेंडर यांनीं दिलेलें उत्तर असेंच मार्मिक आहे. : 'कवीनें आपल्या अनुभूतीशीं सच्चेपणा राखला पाहिजे. जें प्रत्यक्ष अनुभविलें त्याचेंच चित्रण कवि यथार्थतेनें करूं शकेल; ज्या प्रकारचा अनुभव यावा अशी केवळ तीव्र इच्छा असते, त्याचें नाहीं.' ("A poet can only write about what is true to his own experience, not about what he would like to be true to his own experience"). ते पुढें म्हणतात : "Poetry does not state truth, it states the conditions within which something felt is true" ('Still Centre' : 'Foreword')

### प्रकाशाकडे जाण्याची धडपड

अंतर्मनांत चाललेल्या संघर्षासंबंधीं लिहिलेल्या 'Darkness and Light' या कवितेंत त्यांच्या प्रेरणा, अनुभूती व स्वतःच्या काव्यासंबंधीच्या आकांक्षा चांगल्या रीतीनें व्यक्त झाल्या आहेत :

"To break out of the chaos
of my darkness
Into a lucid day
is all my will"

अशी सुरवात करून दुसऱ्याच कडव्यांत

"Yet, equally to avoid
that lucid day
And to preserve my darkness
is all my will."

अशी उलट कबुली कवीनें दिली आहे.

उच्च आकांक्षा आणि स्वतःच्या दौर्बल्याची तीव्र जाणीव, यांतून निर्माण झालेली ही मनाची ओढाताण, या लेखाच्या सुरुवातीस वर्णन केलेल्या आधुनिक परिस्थितीचा परिपाक होता असें म्हटल्यास वावगें होणार नाहीं. जुन्यापुराण्या जगाचा विनाश डोळ्यापुढें दिसत होता. नवीन जगाची उभारणी अजून पुरती झाली नव्हती. आजूबाजूचे सर्व विचारवंत ॲर्नाल्डनें वर्णन केलेल्या, " ... between two worlds, one dead, the other powerless to be born " या संभ्रमांत सांपडले होते. अशा या संधिकालांत निर्माण होणारें वैफल्य स्पेंडर यांच्या काव्यांत दिसून येतें.

वैफल्यवादी कवींच्या तांड्यांत मात्र स्पेंडर कधींच दाखल झाले नाहींत. एका बाजूला हटवादीपणानें आपल्याच कल्पनांना घट्ट कवटाळून बसणारे क्रांतिवीर व दुसऱ्या बाजूस, 'जीवन असार आहे, मानव हा एक क्षुद्र जंतू आहे' ही मनांत पक्की खुणगांठ बांधलेले वैफल्यवादी या दोहोंच्या संपर्कापासून स्पेंडरना चार हात लांब उभें रहावेसें वाटतें. मात्र यामुळें विसाव्या शतकांत निर्माण झालेल्या यक्षप्रश्नाचें उत्तर मिळविण्याची त्यांची तळमळ बिलकूल कमी होत नाहीं. या प्रश्नाच्या विविध अंगोपांगांकडे ते डोळेझांक करीत नाहींत. फक्त, 'सब घोडे बारा टक्के' या एकमार्गी वृत्तीनें आपणांस सांपडलेला मार्ग हाच सर्व परिस्थितीवर रामबाण उपाय आहे या अंधश्रद्धेंतून निर्माण होणाऱ्या खोट्या आत्मविश्वासांत ते मश्गुल रहाण्यास तयार नाहींत. त्यांच्या काव्यविकासाचें परिशीलन केल्यास, त्यांच्या काव्यांत, अंधारांतून प्रकाशाकडे जाण्याची त्यांची धडपड व त्यांत अनुभवास येणारें क्षणैक वैफल्य व आशानिराशा यांचा पाठशिवणीचा खेळ चालू असलेला दिसतो.

" Centre and circumference
are both my weakness.
O strange identity
of my will and weakness
My will behind
my weakness silhouettes
My territories of fear,
with a great sun, "

एवढ्यावरच ते थांबत नाहींत. आपल्या प्रगतीची निश्चित आशा व्यक्त करणाऱ्या ओळींनीं त्यांनीं 'Darkness and Light' या कवितेचा शेवट केला आहे.

" I grow towards the acceptance
of that sun
Which hews the day
from night. The light
Runs from the dark,
the dark from light
Towards a black and white
total emptiness.
The world, my life,
binds the dark and light
Together, reconciles and separates
In lucid day,
the chaos of my darkness."

## कवि आणि कम्युनिझम

श्री. स्पेंडर हे जरी जहाल कम्युनिस्ट कधींच बनले नाहींत, तरी पराभूत जर्मनींत दृष्टोत्पत्तीस आलेलें दैन्य आणि दुःख, स्वतःच्या राष्ट्रांत जागोजागीं डोळ्यांत खुपणारी सामाजिक व आर्थिक विषमता, फॅसिझम् व कॅपिटॅलिझम् यांच्या अशुभ युतीनें निर्माण होत असलेल्या युद्धाच्या कृष्णच्छाया —हें सर्व त्यांना सतत भेडसावीत होतें. यामुळेंच विषमतेचा नायनाट करून, युद्धाच्या सतत रेंगाळणाऱ्या भीतीपासून जगाला मुक्त करण्याच्या कम्युनिस्ट विचारांतील प्रेरणांनीं त्यांना आकर्षून घेतलें. सुरुवातीच्या कवितांत या तत्त्वाचा व विचारसरणीचा प्रभावी प्रचार करण्याचें कंकणच त्यांनीं बांधलेलें आढळतें. शब्दरचनेवरहि मार्क्सवादी भाषेचा परिणाम झालेला आपल्या नजरेस येतो. कांहीं कवितांत त्यामुळें निर्माण होणारी कृत्रिमता मनाला खटकते. 'Easter Monday' या कवितेंतील खालील ओळी पहाः

" The bourgeois in tweeds
Holds in his golden spectacles '
Twin lenses, the velvet and far
Mountains. But look, rough hands
From trams, buses, bicycles,
and of tramps.








राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत




द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

Like one hand red with labour, grasp
The furred and future bloom
Of their falling, falling world."

'हें चित्र पहा, आणि तें चित्र पहा' अशा प्रकारची ही प्रचारकी भूमिका पुढें हळुहळु कमी होत गेली. एक सामाजिक कर्तव्य म्हणूनच काव्य लिहिणाऱ्या या पिढीबद्दल व्हर्जिनिआ वुल्फ-सारख्या टीकाकारांनीं तिरस्कार व्यक्त केला आहे. परंतु जगांत घडणाऱ्या या प्रचंड घडामोडींनीं कविहृदयावर येवढें आक्रमण केलें होतें कीं त्यापासून अलिप्त राहणेंच कलावंतांना शक्य नव्हतें, ही गोष्ट या टीकाकारांच्या ध्यानांत आली नाहीं, अशी स्पेंडर यांची तक्रार आहे. प्रत्यक्ष अनुभवास आलेल्या सार्वत्रिक भावनांचें चित्रण करण्याची कविमनास लागलेली ओढ, व त्याचबरोबर या अनुभवाशीं अजून आपण समरस होऊं शकत नाहीं ही सतत बोचणारी जाणीव, यांतून निर्माण झालेला गोंधळ हळुहळु कमी करण्याचा श्री. स्पेंडरनीं कसोशीनें प्रयत्न केला आहे. राजकारण (Politics) व काव्य यांचा निकटचा संबंध स्पेंडर यांना मान्य आहे, परंतु त्यांना अभिप्रेत असलेला राजकारणाचा अर्थ मात्र खूपच विशाल आहे : "I used the word 'political' in a very wide sense, to cover a fatality which I felt to be overtaking our civilisation and which influenced our modern writing more explicitly than was generally realised."
—(World Within World, p. 249).

ही जाणीव जसजशी तीव्र होत गेली, तसतसा त्यांच्या वर्गविग्रहासंबंधींच्या कवितांत जास्ती जिवंतपणा भरूं लागला. उसनें आणलेलें अवसान व नाटकांतील पात्रांप्रमाणें पाठ केलेलीं भाषणें मागें पडून हळुहळु जीवनाची खोली जाणवूं लागली. कृत्रिमतेला दूर सारून भावनेचा ओलावा साध्यासुध्या अनुभवांतहि नवें सामर्थ्य निर्माण करूं लागला. गलिच्छ वस्तींतल्या एका शाळेंतल्या मुलांचें हें वर्णन पहा :

"Far, far from gusty waves
these children's faces
Like rootless weeds
the torn hair round their paleness
The tall girl with her weighed-down head
The paperseeming boy with rat's eyes.
The stunted unlucky heir
Of twisted bones,
reciting a father's gnarled disease,
His lesson from his desk.
At back of the dim class,
One unnoted, sweet and young:
his eyes live in a dream
Of squirrel's game,
in tree room, other than this."
—('An elementary school classroom in a Slum.')

माणसानेंच निर्माण केलेल्या नरकांतील या अश्राप जीवांचें हें चित्र कोणालाहि वैभवाच्या व सुखसमृद्धीच्या स्वप्नांतून खडबडून जागें करील. दुःखानें भारावलेल्या संयमपूर्ण शब्दांत आनंदाला पारखा झालेल्या या बालकांच्या करुण परिस्थितीचें वर्णन पहाः—

"... And yet, for these
Children, these windows,
not this world, are world,
Where all their future's
painted with a fog,
A narrow street sealed in
with a lead sky,
Far, far from rivers,
capes and stars of words."
—(Ibid.)

'Exiles from their Land, History their Domicile' या कवितेंतहि कवीनें प्रचारकावर विजय मिळविलेला दिसून येतो. सार्वत्रिक स्वरूपाची भावना वैयक्तिक अनुभवाच्या मुशींत ओतली म्हणजे मनाची सहज पकड घेणारें काव्य कसें निर्माण होतें याची कल्पना 'A Footnote' या कवितेंतील शेवटच्या कडव्यावरून येईल.

"You are the birds of a songless age
Young like the youngest gods, rewarded
With childhood that forever stays.



अनुक्रमणिका







Stunted spirits in a fog
Woven over the whole land
Into brown tapestries,
You cry among the wheels
and endless days
To your stripped and holy mothers
With straps tied around their waists
For dragging trucks along a line.
In the sunset above these towns
Often I watch you
lean upon the clouds
Momently drawn back like a curtain
Revealing a serene, waiting eye
Above a tragic, ignorant age."

हें काव्य निःसंशय परिणामकारक आहे. परंतु तरीहि जर कवीची झेंप यापलीकडे गेली नसती, तर कालांतरानें त्याची झिलई कमी होऊन नकळत कंटाळवाणा तोच-तोचपणा आला असता. एखादी तत्त्वप्रणाली अगर विचारधारा जरी कितीहि सर्वस्पर्शी असली तरी ती साऱ्या संसाराला कवळूं शकत नाहीं. प्रत्यक्ष जीवन हें यापेक्षां अनंतपटीनें समृद्ध, संपन्न आणि वैचित्र्यपूर्ण आहे. विशिष्ट संप्रदायाच्या तत्त्वज्ञानाचें आकलन म्हणजे कांहीं या अवाढव्य व्यापाच्या मूळस्वरूपाचें सर्वगामी ज्ञान होणें नव्हे. जिवंत आणि तेजस्वी काव्य निर्माण व्हावयाचें असेल तर व्यासांप्रमाणें सर्व जगत् ‘उच्छिष्ट’ करण्याचें कर्तृत्व कवीजवळ असावयास पाहिजे. “He looked at life steadily and saw it whole,” या ॲर्नोल्डच्या उक्तींतील उल्लेखिलेली महान् पात्रता अंगीं यावयास हवी.

बायबलमध्यें बेथेस्डा-( Bethesda )-च्या झऱ्याचें असें वर्णन आहे कीं, कोणाहि पंगू अगर दुर्बल माणसानें त्या पाण्यांत एकदां बुडी मारली तर बाहेर येतांना त्याचा नखशिखान्त कायापालट होत असे. सांप्रदायिक तत्त्वप्रणालींचीं पांगळी करणारीं बंधनें झुगारून देऊन स्पेंडरनीं जीवनाच्या झऱ्यांत बुडी मारली. व त्यामुळें त्यांची काव्यप्रतिभा नव्यानें पालवली.

## मृत्यूच्या छायेंतील जीवनदर्शन

विचित्र योगायोग असा कीं स्पॅनिश रणभूमीवर मृत्यूच्या छायेंत वावरत असतांना, जीवनाचें ‘विराट् विश्वरूपदर्शन’ त्यांना घडलें. याच्याच जोडीला दुसऱ्या महायुद्धांत इंग्लंडवर झालेल्या बॉम्बफेकींत मृत्यूची ‘रंगपंचमी’ बघून त्यांचें मन एवढें विदीर्ण झालें कीं त्यापुढें खोट्या शौर्याच्या वेडगळ कल्पना केव्हांच वितळून गेल्या ! जीवनाचें हें ‘संपणें’, कवीला गुदमरून टाकतें.

" Alas for the sad standards
In the eyes of the freshly dead young
Sprawled in the mud of battle.
Stare back, stare back,
with dust over glazed
Eyes, their gaze at partridges,
Their dreams of girls,
and their collected
Faith In home, wound up like a little
watch."
— (‘The Past Values’).

अनिवार धडपड करूनहि जो जीव परत जागा करतां यावयाचा नाहीं, त्याचा सहजासहजी विनाश करणाऱ्या माणसाची चीड येते, त्याचबरोबर त्याची कींवहि येते. या जीवघेण्या लढ्याचा निरर्थकपणा ‘Two Armies’ या कवितेंत उत्तम रीतीनें व्यक्त झाला आहे :

‘All have become
so nervous and so cold
That each man hates
the cause and distant words
Which brought him here,
more terribly than bullets "

या हालांतून सुटका होण्याचे दोनच मार्ग. एक मरण, किंवा जी काय मिळेल ती झोंप.

‘Yet when the sleep,
the images of home
Ride wishing horses of escape
Which herd the plain
in a mass unspoken poem."

द्वेषालाहि मग अर्थ उरत नाहीं. रात्रीं सामसूम होते आणि एकमेकापासून थोड्याच अंतरावर पहुडलेले हे सैनिक शत्रुत्वहि विसरतात :

When the machines are stilled,
a common suffering








Whitens the air with breath
 and makes both one
As though these enemies slept
 in each other's arms.

मृत्यूच्या कल्पनेनें हळवें झालेलें स्पेंडर यांचें मन युद्धांतील शौर्य आणि यशोवैभव यांचा देखील तिटकारा करूं लागतें. एक छोटा तरणाबांड युवक घरून पळून सैन्यांत दाखल झाला. निर्घृण काळानें त्याच्यावर झडप घातली. त्या मुलाचें हें अकालीं मरण म्हणजे केवढा व्यय आहे ?

" But the boy lying dead
 under the olive trees
Was too young and too silly
To have been notable
 to their important eye
He was a better target
 for a kiss "
('Ultimo Ratio Regum').

हीं रक्तपिपासू युद्धें, शास्त्रज्ञ व महान् राजकारणी पुरुषांच्या प्रतिभेचा हा विलास, यांचें फलित काय ?

" Consider his life
 which was valueless
In terms of employment,
 hotel-ledgers, news-files.
Consider. One bullet in ten thousand
 kills a man.
Ask. Was so much expenditure justified
On the death of one
 so young and silly
Lying under the olive trees,
 O world, O death ?"
-(Ibid).

रणक्षेत्रावर आलेलें मरण वीरोचित म्हणून थोडें तरी त्याचें समर्थन केलें जाईल. परंतु बॉंबहल्ल्यांनीं छिन्नविच्छिन्न केलेल्या कोंवळ्या जीवांचें काय ? वर आकाशांत घिरट्या घालणाऱ्या विमानांत एक बटन दाबलें जातें. आणि खाली केवढा हाहाःकार उडतो !

" Their harlequin – striped flesh
Their blood twisted in rivers of song
Their flashing, trustful emptiness,
Are trampled by an outer heart
 that pressed
From the sky right through the coral
 breast
And kissed the heart and burst. "
-('The Bombed Happiness')

या राक्षसी विनाशानेंच म्हणे देशांचा ऊर्जितकाल साधावयाचा असतो ? असेलहि बापडा पण !

" But nothing, nothing can recall
Gaiety buried under these dead years,
Sweet jester and young playing fool
Whose toy was human happiness "
– (Ibid).

या ओळींतून कविमनाची दिसून येणारी अगतिक फडफड वाचकाला विव्हळ करत. एखादे वेळीं संतापाच्या भरांत मधूनमधून उपरोधाचे फटकेहि कवि लगावतो. परंतु द्वेष, राग, संताप या सर्वांपेक्षां माणसांच्या या वेडगळ आंधळ्या खेळाचा त्यास उद्वेग येतो. हातांचीं बोटें मशिनगनच्या खटक्यावर नाचत आहेत आणि याच तालावर तोंडांतून शांततास्तोत्रें गायिलीं जात आहेत ! – या ढोंगी देखाव्यावरील कवीचा विश्वास पुरता उडून गेला आहे.

शत्रूच्या गोळीनें नव्हे तर केवळ भीतीनेंच मरण आलेल्या 'भित्र्या'बद्दलहि त्यांना सहानुभूति वाटूं लागते :

" I gather all my life and pour
Out its love and comfort here,
To populate his loneliness,
And to bring his ghost release,
My love and pity shall not cease
For a lifetime at least "
— ('The Coward').

## समाजाचा केंद्रबिंदु : व्यक्ति

युद्धकालांत मानवी जीवाचें महत्त्व कमी लेखण्याची वृत्ति बळावूं लागते. कोणत्यातरी तत्त्वज्ञानानें पछाडलेलीं मनें या रणयज्ञांत अमानुषपणें निरपराध लोकांचे बळी देत असतात. केवळ हुकूमशाहीच नव्हे, तर अनेक वेळां लोकसत्ताहि समाजोन्नतीच्या नांवावर व्यक्तींचा

संहार बिनदिक्कतपणें करीत असते. या क्रूर कत्तलीला, स्त्री, बालक हा भेद नाहीं. या सर्वांवर पुनः स्वार्थ-त्यागाचा सोज्वळ बुरखा चढवून, त्याचाच उदोउदो केला जातो. हा मानवी माहात्म्याचा अधिक्षेप स्पेंडरना सहन होत नाहीं. समाज आणि व्यक्ति यांच्या परस्परावलंबी संबंधांतील समाजाचें स्थान कितीहि श्रेष्ठ असलें, तरीहि व्यक्ति हीच शेवटीं केंद्रस्थानीं राहिली पाहिजे, हें विसरून चालणार नाहीं.

याचमुळें त्याग, शौर्य, वीर्य या सर्वांपेक्षां माणसाला माणसाबद्दल वाटणारी आपुलकी, हेंच सर्वोच्च मूल्य ठरतें. " Thoughts during an Air Raid " या कवितेंत ते म्हणतात :

... " The essential is
That all the 'I's
should remain separate
Propped up under flowers,
and no one suffer
For his neighbour.
Then horror is postponed
For everyone until it settles on him
And drags him
to that incommunicable grief
Which is all mystery or nothing."

स्पॅनिश युद्धांत लढणारे Militiamen त्यांच्या हातांतील वर्तमानपत्राकडे पाहून विचारतात,

"How do they speak of our struggle,
over the frontier ? "

उत्तरादाखल स्पेंडरनीं वृत्तपत्र पुढें केलें.

" .... but they refuse,
They did not ask for anything
so precious
But only for friendly words
and to offer me cigarettes. "
– (' Port Bou ').

'The Vncreating Chaos', 'Darkness and Light', 'Human Situation', 'Variations on my Life' या कवितांत आपणांस भेडसाविणाऱ्या प्रश्नांचें उत्तर कवीनें दिलें आहे :

" Here I am forced on to my knees
On to my real and own
and only being
As into the fortress
of my final weakness."
– ('The Human Situation').

साम्यवादी विचारसरणींत अभिप्रेत असलेल्या वर्गलढ्याबाबतची जागृति हें काव्याचें एक उद्दिष्ट असावें हें जरी स्पेंडरना मान्य होतें तरीहि या व्यतिरिक्त इतर विचारसरणीच्या कवींची ' पलायनवादी ' म्हणून हेटाळणी करणें त्यांना कधीच मानवत नाहीं. कारण या तथाकथित ' पलायनवादी ' लेखकांना आदरणीय वाटणारींच मूल्यें सर्वांच्या आटोक्यांत यावींत, हेंच तर क्रांतीचें अंतिम ध्येय आहे.

परंतु या साऱ्या गोष्टी अस्सल काव्यगुणांच्या दृष्टीनें दुय्यमच ठरतात. विचारांची अगर तत्त्वांची विशिष्ट पद्धतीनें मांडणी हें काव्याचें उद्दिष्ट नसून, या विचारांचा मनावर झालेला आघात व त्यांतून निर्माण झालेलीं अनुभूतीचीं वादळें यांचें चित्रण करण्याचा कवीचा प्रयत्न असतो. यामुळेंच एका विशिष्ट तत्त्वप्रणालीचा चष्मा लावून त्याबरहुकूम कविता घडविण्याचा अट्टाहास हास्यास्पद ठरतो. ' जें न देखे रवि, तें देखे कवि ' यामागचा आशयहि हाच असावा. सर्व बंधनांच्या पलीकडे जाऊन, आयुष्यांत दडलेल्या गूढार्थाचा मागोवा घेण्याचें कार्य करण्यासाठीं, विचारप्रणालीच्या वा तत्त्वज्ञानाच्या बेड्या झुगारून द्याव्या लागतात. काय बघावयाचें याबद्दल दुसऱ्याचे हुकूम स्वीकारून प्रतिभाशाली काव्य निर्माण करण्याचे प्रयत्न निष्फलच ठरतात. निरनिराळ्या विचारप्रवाहांची हळुवार व संवेदनाक्षम मनाला झालेली जाणीव व तिची यथार्थ अभिव्यक्ति, यांवरच काव्याचें यश अवलंबून आहे. Day Lewis नें म्हटलेंच आहे, " It is always dangerous and impertinent to commend a poem for anything but its poetry. " श्री. स्पेंडर यांच्या कवितेचें मूल्यमापनहि, त्यांच्या विचारप्रणालीवरून न करतां, तिला हाच शुद्ध काव्याचा मानदंड लावून केलें पाहिजे.

## भीषणता व सौंदर्य यांचा आविष्कार

स्पेंडर यांच्या काव्यांत भीषणता व सौंदर्य यांचा

एकत्र आविष्कार अनेक वेळां प्रत्ययास येतो. केवळ सौंदर्यानें न्हाऊन निघालेली त्यांची कविता विरळाच. दुःखद अनुभवांची रुखरुख त्यांच्या काव्यांत रेंगाळतांना आढळते. मनाला धक्का देणारीं अशीं वर्णनेंहि त्यांच्या काव्यांत मिळूं शकतात :

"Heads bounce down stone steps ....'
'.... Hands severed from the wrists
Moving only with the thoughts
in fingers....'
'.... I laugh because my laughter
Is like justice twisted by a howitzer."

दुःखाबरोबरच उपहासहि अनेक वेळां डोकावतो :

"The guns spell money's ultimate
reason
In letters of lead on the spring hill-side."
"The corroded charred
Stems of iron town trees
shoot pure jets
Of burning leaf."

हें लिहिणारी स्पेंडर यांची लेखणी

I assemble an evening with space
Pinned above the four walls of the
garden,
A glowing smell of being under canvas,
The sunset tall above the chimneys"....

अशा ओळीहि तितक्याच सहजपणें लिहूं शकते.

त्यांच्या कल्पनाशक्तीची व लालित्यपूर्ण सुकुमारतेचीं उदाहरणेंहि अनेक देतां येतील :

'Children who extend
their smiles of crystal
And their leaping gold embrace'
'History has tongues, has angels,
has guns.'
'Their deeds and deaths are birds.
They stop the invisible
Speed of our vacant sight
across the sky"........

## कवीचें भावविश्व

स्पेंडर यांच्या 'World Within World' या आत्मचरित्रांतील खालीं उद्धृत केलेल्या ओळी, या कवीचें भावविश्व व त्याच्या आकांक्षा आणि प्रेरणा यांवर प्रकाश टाकतील :

....So I thought that under all causes and appearances, there was an extreme simplicity, like that of a lost child or sick person. What really mattered were extreme situations, in the light of which ordinary ones should be judged: the beginning of creation, the end of the world, extreme poverty or suffering, great love, death. Life acquired significance, — I thought, when I was nine or ten — in so far as isolated moments of living were stretched upon these extremes, penetrated by the awareness of ultimate ends. Health and well-being and comfort should not simply be an escape into the body or the money, from the realities which are always present, and which all finally have to face. ........"

........"All men know is that conditioning in time & space and human psychology, which all share in common, and which throw them into life like shipwrecked people upon a sea. In their situation the only sanity must lie in helping one another, and above all for each generation to remember that the New World is simply their children, who form the next."

स्पेंडर यांचें काव्य अजून विकासावस्थेंत आहे. जें जें प्रत्ययास येईल, त्याचा अधीरेपणानें सांठा करण्याची त्यांची मधुलोलुप वृत्ति, व प्रतिभेच्या पंखावर आरूढ होऊन क्षितिजापलीकडे जाणारी त्यांची झेंप – यांमुळें त्यांचें काव्य अधिकाधिक जिवंत, विशाल, सखोल व समृद्ध बनत आहे. आधुनिकता, नावीन्य, प्रचारकाची भूमिका इत्यादि मनाची सहज पकड घेणाऱ्या परंतु क्षणजीवी ठरणाऱ्या गुणांऐवजी, परंपरागत भासणाऱ्या पण शाश्वत असणाऱ्या मूल्यांची त्यांनी कांस धरली आहे. व यांतच त्यांच्या मोठेपणाचीं बीजें सामावलीं आहेत.



अनुक्रमणिका








श्री. पु. ह. पटवर्धन

# श्री. जवाहरलाल नेहरू

" नवभारताचें हृदय जवाहरलालजींनीं जिंकलें आहे. ते धीरोदात्त पुरुष आहेत. त्यांच्यासारखा दृढनिश्चयी व असीम धैर्य असलेला पुरुष विरळा. आपल्या प्रज्ञेनें व अचल सत्यनिष्ठेनें त्यांनीं हें श्रेष्ठपद मिळविलें आहे. कपट व आत्मवंचना यांनीं दूषित झालेल्या राजकारणाच्या धुमाळींत त्यांनीं नीतीचा ध्वज उंच धरलेला आहे......

जवाहरलाल म्हणजे प्रत्यक्ष ऋतुराज! चिरयौवनाचा व आनंदाचा पुतळा...... "

—रवीन्द्रनाथ ठाकुर

१९३६ सालीं रवींद्रनाथांनीं व्यक्त केलेली ही भावना आजहि जनतेच्या मनांत जशीच्या तशी आहे. पंडितजींच्या चिरतारुण्याचें जनमनाला वाटणारें असीम कौतुक यत्किंचित्‌हि कमी झालेलें नाहीं. निसर्गशक्तींच्या कामाला जसा खळ नाहीं, तसा पंडितजींच्या कामालाहि. पुराणांतरींच्या एखाद्या धीरोदात्त पुरुषाप्रमाणें जवाहरलाल रात्रंदिवस कार्यमग्न असतात. या नोव्हेंबर १४ ला जवाहरलाल नेहरूंना पासष्ट वर्षें पुरीं होतील. पण अद्याप वार्धक्य त्यांना शिवलेलें नाहीं. कधींहि पहावें, दंवांत न्हालेल्या टपोर फुलाप्रमाणें ते प्रसन्न दिसतात. त्यांच्या उत्साहाला, धडाडीला सीमा म्हणून ठाऊक नाहीं. या त्यांच्या गुण-समुच्चयामुळें भारताचें मन त्यांनीं भारून टाकलें आहे. देशाच्या कोठल्याहि कोनाकोपऱ्यांत ते गेले तर दर्शनासाठीं अधीर झालेला जनसागर त्यांच्याभोंवतीं हेलावूं लागतो. जनतेला त्यांचें अनावर आकर्षण आहे. आपल्या स्वातंत्र्ययुद्धांतील थोर नेत्यांनीं घालून दिलेली कर्मयोगाची उज्ज्वल परंपरा ते पुढें चालवीत आहेत. परंपरागत धार्मिक श्रद्धा व कर्मकांड यांना झुगारून देऊन[1] केवळ ध्येय-बुद्धीनें माणूस कर्मयोग करूं शकतो हें त्यांनीं आपल्या उदाहरणानें सिद्ध केलें आहे. क्षत्रिय-धर्म व यतिवृत्ति यांच्यांत विरोध असलाच पाहिजे असें नाहीं, हें त्यांनीं दाखविलें आहे. कामाचा केवढा डोंगर ते शिरावर वाहात आहेत! ते पंतप्रधान आहेत, परराष्ट्रीय खातें त्यांचेकडे आहे, ते संरक्षणमंत्री आहेत, अर्थसचिवासारखा कोणी मंत्री परदेशांत गेला तर त्याचें खातेंहि तेच सांभाळतात. राष्ट्रीय-नियोजन-मंडळाचे ते अध्यक्ष आहेत. कॉंग्रेससारख्या देशव्यापी राजकीय संघटनेचे तेच कर्णधार आहेत. शिवाय अणुशक्ति-संशोधन-मंडळासारख्या वैज्ञानिक समित्यांचे व 'विश्वभारती'सारख्या शैक्षणिक पीठांचे कुलगुरु तेच आहेत. अशीं एक ना हजार कामें स्वखुषीनें त्यांनीं अंगावर घेतलीं आहेत. आणि गेलीं सात वर्षें साक्षेपानें तीं पार पाडीत आहेत. हीं नित्याचीं सरकारी व सार्वजनिक कामें सांभाळून त्याव्यतिरिक्त अगणित नैमित्तिक समारंभांत ते असतातच. मोठमोठाल्या नव्या धरणांचें उद्‌घाटन असो, पूरग्रस्त विभागांची विमानांतून पाहणी करणें

१ परलोकवादाचें आपणास कसें आकर्षण नाहीं, मानवी जीवनाच्या गूढ सौंदर्यातच आपण कसें रमून जातों याविषयीं नेहरूंनीं अनेकदां लिहिलें आहे. पुढील उतारा पहा:

'Often as I look at this world, I have a sense of mysteries of unknown depths....The urge to understand it, so far as I can, comes to me. To be in tune with it and to experience it in its fullness ....... Essentially I am interested in this world, in this life, not in some other world, in future life."

— 'The Discovery of India', (p. 16).








असो, दिल्लींत नित्य भरणाऱ्या तज्ज्ञांच्या परिषदा असोत किंवा परदेशांतून आलेल्या मुत्सद्द्यांचे स्वागत-समारंभ असोत, साहित्य-परिषद् असो, सैनिकांचें संचलन, आरमाराची सलामी, सिने-नटांची मजलिस, बालकांचा मेळावा किंबहुना समाजाचें कोणतेंहि कार्य असो पंडित नेहरू तेथें जातात, मनःपूर्वक त्यांत भाग घेतात, कुतूहलानें व जिज्ञासुवृत्तीनें रस घेऊन सारें पाहतात. या सर्व भूमिका वठवीत असतांना एखाद्या अभिजात नटाप्रमाणें त्या त्या वेळीं त्या त्या भूमिकेशीं ते पूर्णपणें समरस होतात. वेठ-बिगारी सारखें किंवा यंत्रवत् काम करणें त्यांना माहीतच नाहीं. एखादा भक्त सर्वस्वसमर्पण करतो त्याप्रमाणें प्रत्येक अंगीकृत कार्यांत ते जीव ओतीत असतात. आणि त्यामुळेंच त्यांच्या विविध कार्यांमध्यें आशावादाचा परिमल दरवळत असतो. दिवसांतून चार-चार आणि पांचपांच भाषणें करण्याचा अनेक वेळीं त्यांना प्रसंग येतो; शाळामास्तराप्रमाणें तेच ते धडे न कंटाळतां पुन्हां शिकवावे लागतात. रोज नवीन काय सांगणार ? पण त्याच गोष्टी जिव्हाळ्यानें सांगितल्यामुळें ऐकणाऱ्यांना त्या कंटाळवाण्या वाटत नसाव्यात. संसदेंतील त्यांचीं कांहीं भाषणें मात्र चक्री-पुराणासारखीं कधीं कधीं कंटाळवाणीं होतात अशीं तक्रार ऐकूं येते. केव्हांहि पहा, वृत्तपत्रांचे तीनतीन चारचार रकाने त्यांच्या भाषणांनीं भरलेले दिसतात. एक पात्रावर आधारलेल्या पृथ्वीराजांच्या नाटकाप्रमाणें आपल्या भारतीय लोकसत्ताकाच्या नाटकांतील तेच खरे सूत्रधार व तेच नायक आहेत. काँग्रेससारख्या राजकीय संघटनेच्या कुडींतील नेहरू हाच प्राण आहे. मग बाहेरच्या जगानें नेहरू म्हणजे हिंदुस्तान असें समीकरण केलें असलें तर काय नवल ?

## अलौकिक नेताः वरदान कीं अभिशाप ?

पं. नेहरूंचें अलौकिक व्यक्तिमत्त्व निर्विवाद असलें तरी लोकशाही समाजामध्यें नेता व अनुयायी यांच्यामध्यें इतकें अंतर असणें हितावह आहे काय ? — हा विचार करण्यासारखा प्रश्न आहे. आपल्या व्यक्तिमत्त्वाच्या झगझगाटानें राष्ट्राच्या दुर्बलतेवर ते पांघरूण घालीत असले व आपल्याला निभावून नेत असले तरी हें परावलंबित्व शेवटीं समाजाचें अनहितच करील. जो समाज एका नेत्यावर इतक्या पूर्णत्वानें अवलंबून राहतो त्या समाजांत लोकशाहीपरंपरा निर्माण होऊ शकत नाहीं. गेल्या महायुद्धाच्या काळांत ग्रेट ब्रिटनमध्यें चर्चिल यांचें नेतृत्व असेंच सर्वमान्य झालें होतें. ग्रेट ब्रिटनच्या दुर्दम्य निर्धाराचें चर्चिल हेंच प्रतीक होते. राष्ट्राची त्यांच्या विभूतिमत्त्वावर गाढ श्रद्धा होती. पण युद्ध संपतांच झालेल्या निवडणुकींत जनतेनें त्यांना बाजूला सारून ॲट्लींना कौल दिला. विभूतिपूजा ही मानवी मनाची सनातन व सर्वत्र आढळून येणारी वृत्ति आहे. लोकशाहींतहि ती टिकून राहिली आहे. एका मर्यादित स्वरूपांत समाजधारणेला व संघटनेला ती उपकारक होते. पण हिंदुस्थानांतील विभूतिपूजेला अतिशय विकृत स्वरूप आलें आहे. तो एक मानसिक रोगच बनला आहे असें म्हटलें तर अतिशयोक्ति होणार नाहीं. राष्ट्राचा सारा आत्मविश्वास, युयुत्सा, आत्मोद्धाराची ईर्षा व निर्धार विभूतिपूजेनें मारून टाकला आहे. युगपुरुषांना विभूतिपूजेच्या या अहिंसक उपायानें जिवन्त असून मारून टाकण्याची कला अनेक शतकांच्या प्रयोगानें आम्हीं आत्मसात् करून बसलों आहोंत. पंडित नेहरूंचें विभूतिमत्त्व हाच जर आमच्या नूतन लोकशाहीचा गाभा असेल व त्यांची तेजस्विता हेंच आमच्या लोकसत्तानाट्यांतील काव्य असेल तर आपल्या भवितव्याची खासच चिंता करायला हवी ! पंडित नेहरू कट्टर लोकशाहीवादी आहेत. तेव्हां या गोष्टीची जाणीव त्यांना फार पूर्वीपासून आहे. १९३७ सालीं 'चाणक्य' या नांवानें 'मॉडर्न रिव्ह्यू' मध्यें स्वतःविषयीं लिहिलेल्या एका लेखांत ते म्हणतात : " क्रान्तिकाळांत लोकप्रिय नेता सीझरसारखा हुकूमशहा बनण्याची फार भीति असते. उद्यां जवाहरलाल सीझर कशावरून बनणार नाहीं ? भारताला व जवाहरलालला या गोष्टीकडे डोळेझांक करून चालणार नाहीं. दोघांनाहि तें भयावह आहे. एखादा सीझर राष्ट्राचा उद्धार करतो आहे असा आभास जरी कांहीं काळ निर्माण झाला तरी ही घटना राष्ट्राला खुरटें व

निष्क्रिय बनवील व देशाचा अधःपात करील. ”[2] ही जाणीव पंडित नेहरू निरंतर बाळगीत आले असले तरी शेंकडों वर्षांच्या पारतंत्र्यामुळें व दैन्य-दारिद्र्यामुळें आपला समाज इतका सुस्त व जड बनला आहे कीं विभूतिपूजा हाच त्याचा पुरुषार्थ बनला आहे. एखाद्या अंमली व्यसनाप्रमाणें विभूतिपूजेचें समाजाला व्यसन जडलें आहे. भारताच्या हजारों वर्षांच्या इतिहासांत प्रत्येक कालखंडांत कमीअधिक प्रमाणांत हेंच आपण पाहतों. हिमाच्छादित गिरिशिखराप्रमाणें शोभणारे राजर्षी, धीरोदात्त वीर-पुरुष, संत महात्मे या पुण्यभूमींत होऊन गेले. पण सर्वसामान्य माणसांची उंची मात्र कधीं विशेष उंचावली नाहीं. बहुजनसमाज गवतासारखा खुजा व कर्तृत्वशून्य राहिला. लोकशाहीच्या जमान्यांत कार्लाइलनें गौरविले-ल्या 'लोकनायकां'ना गौण स्थान असतें. जनता हीच प्रमुख भूमिका वठवीत असते. एकाद्या लोकोत्तर विभूतीच्या नेतृत्वापेक्षां प्रामाणिक, कष्टाळु व तत्त्वनिष्ठ अशा साधारण माणसाचें नेतृत्वच अधिक उपकारक ठरतें. ग्रेट ब्रिटनच्या मजूर-पक्षाचे क्लेमंट ॲटली हे लोकशाहींतील नेत्याचें नमुनेदार उदाहरण आहे. त्यांच्या व्यक्तिमत्त्वांत कादंबरीयोग्य असा कोणताहि गुण सांपडणार नाहीं. पण त्यामुळें ते कांहीं कमी परिणामकारक नाहींत. लोकशाहींत अवतारी पुरुष म्हणून नेत्याची कोणी पूजा करीत नाहीं किंवा त्याला आजन्म अधिकारपदहि बहाल करीत नाहीं. समाजाची एक विशिष्ट सेवा बजावल्याबद्दल नेतृत्वाचा अधिकार कांहीं काळ त्याला देण्यांत येतो. नेत्यानें जनतें-तील कर्तृत्व जागृत केलें पाहिजे. समाजांत आत्मविश्वास व कार्यकुशलता निर्माण केली पाहिजे. पण आपण आज असें पाहतों कीं भोंवतालची आर्थिक व राजकीय स्थिति जितकी गुतांगुंतीची, अस्थिर व असुरक्षित होत आहे तितकी नेत्यांची महती अधिक वाढत आहे. 'बुडत्याला काडीचा आधार' म्हणतात त्या न्यायानें कोणातरी शूर पुरुषाला नेता म्हणून त्याच्यावर आपलें ओझें टाकून निर्धास्त होणें लोकांना स्वाभाविक असतें. निष्क्रिय जनतेची विभूतिपूजा लोकशाही समाजाला अत्यंत हानिकारक होते. निर्बुद्ध व निष्क्रिय जनतेला अलौकिक नेता मिळणें हें वरदान कीं अभिशाप हें विचार करण्यासारखें आहे.

### स्वतःला व राष्ट्राला एक आव्हान !

पंडित नेहरूंच्यावर भारताची किती दारमदार आहे, भारतीय लोकसत्ताकाची द्वारका एका खांबावर कशी आधारलेली आहे, याची विदारक जाणीव आपल्या सर्वांना नुकतीच झाली आहे. सप्टेंबरच्या अखेरच्या दिवशीं दिल्लींत काँग्रेस-खासदारांच्या सभेंत भाषण करतांना आपल्यावरील जबाबदाऱ्यांचें ओझें आपल्याला कधीं कधीं असह्य होत असल्याची पंडित नेहरूंनीं तक्रार केली व त्यांपैकीं कांहींतून मुक्त होण्याची इच्छा व्यक्त केली. हे त्यांचे सहजोद्‌गार खरे पण त्याचे पडसाद एखाद्या स्फोटाप्रमाणें जगभर उमटले! त्याच्या लागोलाग कोचीन येथें केलेल्या भाषणांत त्यांनीं सांगितलें कीं, “ केवळ काँग्रेसचें अध्यक्षपद नव्हे तर पंतप्रधान-पदाचा त्याग करण्याचा विचार माझ्या मनांत डोकावतो आहे ”! मग तर कोलाहलच माजला. सर्वत्र याच विषयाची चर्चा सुरूं झाली. वृत्तपत्रें भडक मथळयांत विचारूं लागलीं, 'पंडित नेहरूंनंतर काय?' हा विषय मनोरंजक तर खराच पण थोडे गंभीर-पणानें बोलावयाचें तर या प्रश्नाला चटकन् उत्तर देणें कठिण आहे. राजाजींसारखा मुरब्बी मुत्सद्दी सुद्धां परमेश्वराचा हवाला देण्यापलीकडे या प्रश्नाचा खुलासा करूं शकला नाहीं. तर दुसऱ्यांचें काय विचारावें ! पंडितजींचे टीकाकार व विरोधक म्हणतात कीं पंडितजी नंतर अंधार !

आपल्या उद्‌गारांमुळें निर्माण झालेलें हें वादळ

2 “In this revolutionary epoch Caesarism is always at the door. And is it not possible that Jawaharlal might fancy himself as a Caesar? Therein lies

पाहून अधिक तर्कवितर्क वाढूं नयेत या बुद्धीनें पंडित नेहरूंनीं चीनला जाण्यापूर्वी प्रान्तिक काँग्रेस-समित्यांना एक सविस्तर पत्र लिहून आपल्या भूमिकेचा खुलासा केला आहे. जनतेला विश्वासांत घेऊन आपलें हृद्‌गत जनतेपुढें मांडण्याचा पंडितजींना कधीं संकोच वाटत नाहीं. भारतीय जनता हाच त्यांचा समष्टिरूप एकमेव मित्र आहे. या मित्रावर व भारताच्या उज्ज्वल भवितव्यावर त्यांची गाढ निष्ठा आहे. सर्वप्रकारच्या अधिकारपदापासून कांहीं काळ अलग होण्याचा विचार आपल्या मनांत कां आला, हें त्यांनीं आपल्या त्या पत्रांत विशद केलें आहे. भारतीय लोकसत्ता कोणा एका व्यक्तीवर इतकी सर्वस्वीं अवलंबून आहे हें त्यांना वस्तुतः खरें वाटत नाहीं. 'पंडित नेहरूंनंतर काय हा प्रश्न कानीं आला कीं आपल्याला चीड येते' असें ते म्हणतात. 'हा प्रश्न आपल्या स्वतःला व राष्ट्राला एक आव्हान आहे. आणि तें स्वीकारलें पाहिजे' असें त्यांनीं म्हटलें आहे. स्वतःला व जनतेला आश्वासन देण्यासाठीं त्यांनीं असेंहि म्हटलें आहे कीं "भारतासारखा अतिप्राचीन देश एखाद-दुसऱ्या व्यक्तीवर थोडाच अवलंबून आहे ? व्यक्ती येतील आणि जातील, पण इतिहासाबरोबर वाटचाल करीत आलेला हा आपला सनातनदेश प्रगतिपथावर कूच करीत असलेला नित्य दिसेल." हा पंडितजींचा आशावाद आहे, पण प्रश्नाला उत्तर नाहीं. या प्रश्नाची गंभीरता जनतेला भासमान व्हावी, याच हेतूनें त्यांच्या डोक्यांत अनेक दिवस तरंगत असलेला विचार त्यांनीं परवां बोलून दाखविला असावा.

### नवसमाजनिर्मितीची तळमळ

प्रान्तिक समित्यांना लिहिलेल्या या पत्रांत एक अत्यंत मौलिक विचार त्यांनीं राष्ट्रापुढें मांडला आहे. हा विचार त्यांना परवां नव्यानेंच प्रथम सुचला असें नाहीं. त्यांच्यासारखी बुद्धिमान् व अंतर्मुख वृत्तीचीं माणसें "किं कर्म किमकर्मेति" असें नित्य चिंतन करीत असतात. महात्मा गांधी किंवा विनोबाजींसारख्या स्थितप्रज्ञांना अशी समस्या सतावीत नाहीं. एकाच नाण्याच्या दोन बाजूंप्रमाणें कर्म व चिंतन यांमध्यें त्यांना कधीं विसंवाद दिसत नाहीं. विनोबाजींना चिंतनाची इतकी संवय जडली आहे कीं, आतां ते केवढ्याहि मोठ्या जमावांत असले व कार्यरत असले तरी त्यांचें चिंतन चालूंच असतें असें तें सांगतात. पण ही स्थिति संतमहात्म्यांची आहे. कर्मयोग्यांना सुद्धां ती सहज प्राप्त नाहीं. पंडित नेहरूंना हा प्रश्न इतक्या तीव्रतेनें कां भासूं लागला ? श्री. जयप्रकाश नारायण यांच्याप्रमाणें त्यांना कांहीं उपरति झालेली नाहीं. त्यांची समस्या कांहींशी आध्यात्मिक स्वरूपाची दिसली तरी ती प्रामुख्यानें भौतिक कर्मांचीच आहे. आपल्या विविध खटाटोपांत एकसूत्रता व नवचैतन्य आणण्याची आवश्यकता त्यांना तीव्रपणें भासत आहे.[3] नवसमाजनिर्मितीसाठीं आरंभिलेला प्रचंड खटाटोप उदा०, पंचवार्षिक योजनेंतील विविध कार्यक्रम महत्वाचे आहेत असें ते मानतात. पण फूटपट्टीनें न मोजतां येणारी, वजनांत न बसणारी, अशी कांहीं तरी एक अमेय वस्तु आहे जिला महंमद इक्बाल "कुछ बात है" असें संबोधतात ती अद्याप आपण निर्माण करूं शकलों नाहीं याची नेहरूंना खंत आहे. जगामध्यें एक महान् स्थित्यंतर घडून येत आहे याचें त्यांना ज्ञान आहे. म्हणून पंचवार्षिक योजनेच्या कार्यक्रमाबरोबरच जनतेच्या अंतःकरणांत नवसमाजाचें संगीत उमटूं

---

danger for Jawaharlal and India. For it is not through Caesarism that India will attain freedom. And though she may prosper a little under a benevolent and efficient despotism, she will remain stunted and the day of the emancipation of the people will be delayed ".

3 " The real problems for me remain problems of individual and social life, of harmonious living, of a proper balancing of an individual's inner and outer life, of an adjustment of the relations between individuals and between groups, of a continuous becoming something better and higher, of social development, of the ceaseless adventure of man........... A living philosophy must answer the problems of today. "

लागावें असें त्यांना आतुरतेनें वाटतें. नवनिर्मितीचें संगीत ऐकूं येत नाहीं हीच त्यांची खरी वेदना आहे. राजकारणी पुरुषांनीं युगधर्माचा महिमा समजावून घेण्यासाठीं कसोशीनें चिंतन, मनन व अभ्यास केला पाहिजे असें त्यांना नेहमींच वाटत आलें आहे. १९४९ सालीं अमेरिकेच्या दौऱ्यावर असतांना वॉशिंग्टन येथें केलेल्या एका भाषणांत ते म्हणाले: " जगांतील श्रेष्ठ मुत्सद्दी कांहीं काळ भाषणें थांबवतील, पत्रकें काढण्याचें सोडून देतील व स्वस्थ बसून चिंतन-मनन करतील तर आपल्याला भेडसावणारे कांहीं प्रश्न तरी खास सुटतील. अनेक वर्षें कारागृहांत राहिल्यामुळें एकांताचें महत्त्व मला कळलें आहे. चिंतनशील मन सर्जनशील बनलें नाहीं तरी समाहित व शांत खासच होतें. "[४] त्याच दौऱ्यांत कोलंबिया विद्यापीठांत केलेल्या दुसऱ्या एका भाषणांत ते म्हणाले: " राजकारणी पुरुषांचें लक्ष दैनंदिन प्रश्नांवर व तात्कालिक यशावर केन्द्रित झालेलें असतें. उलट, तत्त्ववेत्ते अंतिम प्रश्नांचा विचार करीत असतात. भोंवतालच्या जगाचा व प्रश्नांचा त्यांना विसरच पडल्यासारखा होतो. हे दोन्ही मार्ग मला असमाधानकारक वाटतात. प्लेटोनें वर्णन केलेल्या राजर्षी-( Philosopher-Kings )प्रमाणें, आचार करावयाचा तर या दोन्ही मार्गांचा समन्वय साधला पाहिजे "[५] चिंतन-मनन व कर्म यांचा समन्वय साधणें केवळ बौद्धिक दृष्टीनेंहि त्यांना आवश्यक वाटतें. विज्ञानाच्या प्रगतीमुळें जगांत एक महान् क्रान्ति घडून येत आहे. नवसमाजनिर्मिति करतांना या वैज्ञानिक क्रान्तीची समाजावर होणारी प्रतिक्रिया काळजीपूर्वक अजमावली नाहीं तर मोठ्या प्रयासानें बांधलेलें आपलें नवें समाजमंदिर भंगून जाईल. उद्या अणुशक्तीचा उपयोग उत्पादनकार्याकडे होणार हें निश्चित. विसाव्या शतकाच्या उत्तरार्धांत अणुशक्तीचे दूरगामी परिणाम होणार आहेत. या घटनेचाहि गेलीं दोनचार वर्षें ते खोल विचार करीत आहेत. मागील वर्षीं अशीच एक लहर डोक्यांत येऊन त्यांनीं श्री. जयप्रकाश नारायण, आचार्य नरेन्द्रदेव-प्रभृति नेत्यांशीं सहकार्यासंबंधीं बोलणीं सुरू केलीं. तीं असफल झालीं. पण त्या वेळीं म्हणजे ता. १७ मार्च १९५३ रोजीं जयप्रकाशजींना लिहिलेल्या पत्रांत ते म्हणतात[६]. " माझी अशी भावना आहे कीं, मानवी जीवनावर मूलगामी परिणाम करणारीं स्थित्यंतरें जगभर होणार आहेत. वैज्ञानिक संशोधन व यांत्रिक प्रगति जगाचें रूप पालटीत आहेत. यंत्रयुगांतील हे फेरबदल हितावहच होतील असें मी म्हणत नाहीं. आपण

---

4 " Perhaps some of our problems in the world would be easier of solution if our statesmen instead of delivering speeches and issuing statements, just sat down quietly to think and meditate a little while. Whether I wanted to or not, I had those occasions to think a lot, and whether the thought was always productive of anything or not, still it brought a certain equilibrium and a certain poise. " – ' Visit to America ', p. 12.

5 "Politicians have to deal with day-to-day problems and they seek immediate remedies. Philosophers think of ultimate objectives and are apt to lose touch with the day-to-day world add its problems. Neither approach appears to be adequate by itself. Is it possible to combine those two approaches and function after the manner of Plato's philosopher – kings ? " – ' ibid. ' p. 16.

6 "I have a sensation of basic dynamic changes taking place in the world which are really affecting human life in every aspect. Mostly these result from the pace of technological advance. I do not think these changes are all to the good, but there they are. I have also the feeling that all of us, if I may say so, are apt to be left behind in our thinking by these changes. "

– Nehru - J. P. Talks, p. 17.

आपल्या दैनंदिन कामांत इतके व्यग्र असतों कीं, या वैज्ञानिक क्रान्तीचा शांतपणें विचार करण्यास आपणांस वेळच नसतो. कालमहिमा ओळखल्याशिवाय नवनिर्मिति कशी होणार ? म्हणूनच समाजसेवकांनीं मौलिक विचार करायला शिकलें पाहिजे. " तेव्हां परवांच्या पत्रांत व्यक्त केलेले विचार गेलीं चार वर्षें तरी त्यांच्या मनांत घर करून बसले आहेत हें दिसून येईल. श्री. कृष्णमूर्तींसारख्या तत्त्वचिंतकाशीं प्रसंगोपात्त गांठभेट झाली तरी याच प्रश्नासंबंधीं ते चर्चा करतात.

पंडितजींचें त्यांच्या अनुयायांकडून व चाहत्यांकडून कसें विडंबन होतें व पंडितजींच्या गंभीर विचारांचा कसा पोरखेळ होतो हें त्यांच्या पत्रकावरील विविध निवेदनांत व चर्चांत प्रत्ययास येतें. " आपल्याला कोणताहि रोग, शारीरिक दौर्बल्य, वार्धक्य, नैराश्य, विफलता थकवा किंवा संन्यासवृत्ति आलेली नाहीं. शक्तिसर्वस्व वेंचून भारतीय लोकसत्ताकाची सेवा बजावीत राहण्याचा आपला निर्धार व उत्साह कायम आहे. केवळ अधिक परिणामकारक कार्य करतां यावें, कामाच्या रगाड्यांत मनाची सर्जनशीलता गमावून बसूं नये या एकाच हेतूनें मी स्वतःला थोडी अधिक फुरसत कशी मिळेल याचा विचार करतों आहे. मौलिक विचारासाठीं डोक्यावरील जबाबदाऱ्यांचें ओझें थोडें कमी करणें मला आवश्यक वाटतें " असें त्यांनीं स्पष्ट म्हटलें आहे. असें त्यांनीं म्हटलें असूनहि त्यांनीं काँग्रेसचें अध्यक्षपद सोडावें कीं मुख्यमंत्रिपद सोडावें, एक चिटणीस घ्यावा की दोन–अशा निरर्थक व फुटकळ गोष्टींची चर्चा करण्यापलीकडे, मौलिक विचारांची व चिंतनाच्या आवश्यकतेची ही नवी काय भानगड पंडितजींनीं उपस्थित केली आहे याचा विचार करण्याची सुद्धां कोणाला आवश्यकता भासलेली दिसत नाहीं. आपल्या पत्रांत त्यांनीं उपस्थित केलेला मुद्दा त्यांच्यापुरताच मर्यादित नसून काँग्रेस-पक्षांतील भारत-सरकारांमधील सर्वच कर्त्या पुरुषांना त्यांनीं आवाहन केलें आहे. भूदानयज्ञाप्रमाणेंच, राज्ययंत्र चालविणें हा देखील एक यज्ञ आहे ही भावना त्या यंत्रांत निर्माण झाली पाहिजे अशी त्यांची तळमळ आहे शिळेपणा, सर्जनशील प्रज्ञेचा अभाव व मंत्राच्या जागीं तंत्रावर भर देण्याची वृत्ति हीं सर्व झाडून टाकल्याशिवाय नवनिर्मिति अशक्य आहे अशी त्यांची खात्री पटली आहे.

**'हेंचि फळ मम तपाला !'**

गेल्या सात वर्षांत भारतानें जी प्रगति केली आहे ती नेत्रदीपक नसली तरी उपेक्षणीयहि नाहीं. या संबंधीं आपल्याला समाधान आहे असें त्यांनीं म्हटलें आहे. पंचवार्षिक योजनेचा दुसरा टप्पा सुरूं होतो आहे या वेळीं खोलवर विचार करून आपल्या कार्यपद्धतींत काय फेरफार करावे याचा शांतपणें विचार करणें त्यांना अवश्य वाटावें हें साहजिक आहे. पंडित नेहरू कामाच्या शिस्तीवर व कुशलतेवर इतका भर देतात, भौतिक उपक्रमांचा त्यांना इतका हव्यास आहे की त्यांचा पिंड एखाद्या अमेरिकन यंत्रविशारदासारखा किंवा कारखानदारासारखा असेल असा आभास निर्माण होतो. स्वातंत्र्योत्तर काळांत त्यांनीं प्रखर वास्तववाद दाखविला आहे. मोठमोठालीं कामें पाठीमागें असल्यामुळें व त्यांचा संबंध अगदी बड्या तज्ज्ञांशीं, अधिकाऱ्यांशीं व कारखानदारांशींच अधिक येत असल्यामुळें लहान पण गुणवान् मानवांची त्यांना कदर नाहीं अशींहि उदाहरणें कधीं कधीं घडलेलीं आहेत. ऑक्सफर्ड–विद्यालयीन उच्चार, झकपक पोशाख व कोणत्यातरी क्षेत्रांत मिळविलेलें उच्च पद हीं त्यांची मर्जी व विश्वास संपादन करण्याची सुलभ साधनें आहेत असें लोक मानतात. दुर्मुखलेल्या साशंक विचारी माणसापेक्षां हंसतमुख आशावादी व किंचित् भंपक खटपट्या पुरुषाची त्यांच्यावर अधिक छाप पडते. हें सर्व खरें असलें तरी त्यांचें अंतःकरण उदार आहे. ते एक थोर मानव आहेत. त्यांचा पिंड कलावंताचा आहे. तेव्हां केवळ भौतिक यशानें ते भुलून जाणार नाहींत. " आपण रात्रंदिवस दूरच्या भविष्याचीं तरल स्वप्नें पहात आहोंत. राष्ट्राच्या उद्धारासाठीं मोठ्या आत्मविश्वासानें भगीरथ प्रयत्न आरंभिले आहेत. सर्व जगांत भारताची प्रतिष्ठा होत आहे पण आपल्या देशांत कोणतेंहि भव्य असें एखादें सामुदायिक स्वप्न किंवा आदर्श समाजापुढें निर्माण झालेला नाहीं. आपल्या दर्शनासाठीं जागोजाग जमणाऱ्या लक्षावधी स्त्री-पुरुषांच्या जीवनावर आपण कांहीं चिरकाल टिकणारा संस्कार करूं शकत नाहीं. राष्ट्राचें शील उन्नत होत असल्याची खूण कोठें दिसत नाहीं. ध्येयाचें वेड नाहीं, साहसाची प्रेरणा नाहीं " – समाजाचें

'हंचि फल मम तपाला !' असा सुस्कारा त्यांनीं टाकला, तर काय आश्चर्य आहे ?

**झगझगाटामागें कांहीं अपरिहार्य सांवल्या !**

पंडित नेहरूंना परमेश्वरानें इतकी अमाप गुणसंपदा दिली आहे पण एक गोष्ट दिली नाहीं. सत्ता माणसाला बिघडवते हें ॲक्टनचें वचन नेहमीं उद्धृत केलेलें आपण ऐकतों. तें निरपवाद आहे पण इतकी 'कर्तुम-कर्तुं' सत्ता हातीं असून त्यांचें अंतःकरण इतकें विशाल, निर्वैर व स्नेहमय राहिलें आहे ही त्यांच्या अभिजात थोरवीची साक्ष आहे. भौतिक ऐश्वर्य, ऋद्धि–सिद्धी सारखीं हात जोडून त्यांच्यापुढें सतत उभीं असल्यामुळें सत्तेसाठीं त्यांना काडीमात्रहि कधीं खटपट करावी लागली नाहीं. त्यामुळें कोणाबद्दलहि त्यांच्या मनांत कटुता किंवा वैर नाहीं. पण कार्यांत साथी निर्माण करण्याची कला मात्र त्यांना कधीं साधली नाहीं. स्वतःची अशीं माणसें त्यांनीं कधीं एकत्र केलींच नाहींत. एकाकी राहणें हाच आपला विशेष व हीच आपली शान असें ते मानीत आले आहेत. यदृच्छेनें ज्याच्याशीं गांठ पडेल त्याचें सहकार्य घेऊन काम करणें यालाच ते वास्तववाद म्हणतात. पण त्यामुळें आज ते अगदीं एकाकी व अलग राहिले आहेत. गेलीं पांच वर्षें ते काँग्रेसचे अध्यक्ष आहेत. पण काँग्रेसवर त्यांचा काय प्रभाव पडला असें विचारलें तर काय उत्तर मिळेल ? संघटना बांधण्याचें कसब किंवा लोकसंग्रह साधण्याची कला त्यांना मुळींच साधलेली नाहीं. सरदार पटेल किंवा सुभाषबाबू यांच्यांत ही कला असाधारणपणें दिसून येई. गांधीजी तर मातींतून वीर निर्माण करीत. पंडित नेहरूंच्या हाताला ही पुण्याई नाहीं. सरदारांच्यासारखे ते 'कॉमिसार'हि नाहींत व महात्मा गांधींच्यासारखे 'सन्त'हि नाहींत. माणसें निर्माण करण्याची कला याच कोटींतील लोकांना साध्य होते. पंडित नेहरू म्हणतात, "I am of the earth, earthly मी अतिमानुष नाहीं. साधा मानव आहे, मानवतावाद मला पसंत पडतो. ( A kind of vague humanism appealed to me )" त्यांचा समाजवादहि या मानवी अंतःकरणांतूनच निर्माण झालेला आहे. नवराष्ट्रनिर्मिति करणारा म्हणजे राष्ट्रांतील स्त्री-पुरुषांचीं अंतःकरणें हलवून त्यांच्यावर दीर्घकालीन संस्कार करणारा हा संत-महात्मा नाहीं, हें आपण ओळखलें पाहिजे. विश्वांतील सर्व लहानथोर वस्तूंच्या कांहीं अंगभूत मर्यादा असतात. पंडित नेहरूंच्या व्यक्तिमत्त्वालाहि स्पष्ट मर्यादा आहेत. त्यांच्या कर्तबगारीच्या व शौर्याच्या झगझगाटामागें कांहीं अपरिहार्य सांवल्याहि आहेत. त्या आपण जितक्या डोळसपणें पाहूं तितकें त्यांचें व आपलें भलें होईल.

ऑस्ट्रेलियामधील मेलबोर्न शहरांतील 'आर्गस' नांवाच्या एका प्रमुख पत्रानें त्यांच्यासंबंधीं नुकताच एक प्रशंसापर लेख प्रसिद्ध केला होता. त्यांत पंडित-जींच्या एका मोठ्या दोषावर लेखकानें नेमकें बोट ठेवलें आहे : "He is congenitally incapable of delegating power" अधिकार वाटून देण्याची सत्ता विकेन्द्रित करणाची कला पंडित-जींना मुळींच अवगत नाहीं. एखाद्या नामांकित क्रिकेटपटूनें बोलिंग, बॅटिंग, फील्डिंग एकट्यानेंच करून आपलें अलौकिक क्रीडापटुत्व दाखवूं पहावें–असें पंडित नेहरूंचें होत आहे. त्यांत स्वार्थ किंवा सत्तालोभ नाहीं. सोशिकपणा व चोखंदळ इमानदारी यांचें प्रदर्शन करण्याचीच वृत्ति अधिक असते. पंडित-जींच्यासारख्या थोर राष्ट्रपुरुषाच्या शक्तीचा यत्किंचि-तहि अपव्यय होऊं देणें महापातक समजलें पाहिजे. पंडितजींनीं मुख्य मंत्रिपद सोडावें कीं काँग्रेसचें अध्यक्ष-पद सोडावें हा तपशील सार्वजनिक चर्चा करण्याइतका महत्त्वाचा नाहीं. पंडितजींच्यानंतर त्यांची जागा कोण घेणार हा प्रश्नहि महत्वाचा नाहीं. वर्तमानकाळांत, आज सत्तेची व जबाबदारीची अधिक योग्य व वाजवी वांटणी कशी करायची हा खरा प्रश्न आहे. याला उत्तर शोधलें पाहिजे.

**नेहरू, विनोबा आणि जयप्रकाश**

देशांतील निरनिराळ्या विचारांमध्यें प्रजासमाज-वादाची विचारसरणी पंडितजींना सर्वांत जवळ आहे. कम्युनिस्टांची परकीय देशनिष्ठा व हिंसावाद व जातीयवाद्यांचा आकुंचित दृष्टिकोन किंवा बऱ्याच काँग्रेसजनांत दिसणारा सामाजिक ध्येयदृष्टीचा पूर्ण अभाव – यांपेक्षां समाजवाद्यांची सर्वसाधारण विचार-सरणी त्यांना सगळ्यांत जवळची आहे. विनोबाजींनीं म्हटल्याप्रमाणें ते दोघेहि गांधींचींच लेकरें आहेत.

त्यांच्यातील विरोध स्नेहमय असले पाहिजेत. आचार्य नरेंद्रदेव व श्री जयप्रकाश नारायण यांचे व पंडितजींचे खाजगी संबंध आजहि जिव्हाळयाचे व स्नेहपूर्ण आहेत. पण त्यांच्याशींहि कधीं मनमोकळा विचारविनिमय ते करूं शकत नाहींत. नेहरू व प्र. स. पक्ष यांच्यांतील परस्पर-संबंध ही एक छोटीशी शोकान्तिका आहे. देशांत विधायक कार्याची हवा निर्माण करावी — 'आराम हराम है' हा मंत्र देशभर गुंजवावा या उद्देशानें समाजवादी पक्षाशीं त्यांनीं गेल्या वर्षी वाटाघाटी केल्या. जयप्रकाशजींनीं किमान कार्यक्रम म्हणून एक १४ कलमी योजना त्यांना सादर केली. पण पंडितजी अशा तऱ्हेनें स्वतःला बांधून घेण्यास तयार नव्हते.

"गांधीजींची प्रगतिशीलता आणि सामाजिक न्यायप्रस्थापनेची अविरत तळमळ विनोबाजींच्या कार्याशिवाय मला कोठें दिसत नाहीं" असें जयप्रकाशजींनीं त्यांना सांगितलें. पंडित नेहरूंनीं सहकार्याची आवश्यकता आर्जवून प्रतिपादन केली. पक्षाचें विलीनीकरण वा काँग्रेस व प्र. स. पक्ष, यांचें एकीकरण हा विचारहि या चर्चेत कोणाच्या मनाला शिवला नव्हता. विधायक सहकार्याचीं क्षेत्रें स्पष्ट करणें व त्याच्या वाटेंतील अडचणी दूर करणें हाच खरोखर या वाटाघाटींचा उद्देश होता. पण त्यांतून कांहीं निष्पन्न झालें नाहीं. इतकेंच नव्हे तर प्र. स. पक्षांत अनपेक्षित अशी एक विपरीत प्रक्रिया निर्माण झाली आणि नेहरू व काँग्रेस यांना अस्पृश्य समजून दूर ठेवलें पाहिजे अशी एक विचारसरणी निघाली. ती कायम राहते कीं बदलते, कोण जाणे! पण राष्ट्रांत विधायक प्रयत्नांची हवा निर्माण करावयाची असेल तर हें काम काँग्रेसचीं सरकारें करूं शकणार नाहींत किंवा विरोधी पक्षहि एकस्याच्या पुण्याईवर ती निर्माण करूं शकणार नाहींत. पंडित नेहरू श्री. जयप्रकाश नारायण व विनोबाजी यांचीं कार्यक्षेत्रें भिन्न असलीं तरी त्या सर्वांची दिशा एक असली पाहिजे व त्यांच्यांत अधिक विचारविनिमय व सहकार्य नांदलें पाहिजे. तरच राष्ट्रांत नवीन जोम निर्माण होण्याची कांहीं आशा आहे.

गेल्या महिन्यांत चीनचे पंतप्रधान, चौ एन लाय यांना दिल्लींत दिलेल्या मेजवानीच्या प्रसंगीं पंडित नेहरू म्हणाले : "Destiny beckons to our countries and I hope, neither of them will be found wanting at this great moment of history." आशियाई राष्ट्रांच्या पुनरुत्थानाचें युग उगवलें आहे. या युगांत चीनला व भारताला फार मोठी कामगिरी आहे. आपले दोन्ही देश इतिहासाची म्हणजे युगपुरुषाची ही अपेक्षा पूर्ण करतील अशी मला आशा आहे. आपलें परराष्ट्रीय धोरण परिणामकारक व्हावयाचें असलें तर राष्ट्रांत नवीन ध्येयनिष्ठा निर्माण झाली पाहिजे. पंडित नेहरूंच्या कांहींहि उणिवा असल्या तरी नवभारताच्या निर्मितीसाठीं निसर्गशक्तीप्रमाणें राबणारी ती एक प्रभावी शक्ति आहे. सहकार्याचीं क्षेत्रें लोकशाही मार्गानें वाढवीत राहणें हाच समाजस्थित्यंतराचा मार्ग आहे.

---

## लोकशाहींतील राज्यकर्त्यांची अधिकारनिवृत्ति

कांहीं काळ आपण अधिकार-निवृत्त व्हावें या श्री. नेहरू यांनीं व्यक्त केलेल्या इच्छेबद्दल 'सिडने मॉर्निंग हेरल्ड' हें वृत्तपत्र म्हणतें : "लोकशाही राज्यकर्त्यांत एक गोष्ट हुकुमशाहींतल्यासारखी आढळून येते. ती म्हणजे शक्य तितक्या दीर्घ कालपर्यंत अधिकारपदाला चिकटून रहाणें. त्यांना अगदीं प्रामाणिकपणें असें वाटतें कीं आपण लोकराज्याचे सेवक असून, अधिकारपदावर राहूनच आपणांस ही राज्यसेवा करतां येईल! पंच्याहत्तरी उलटून गेलेले चर्चिल व अ‍ॅडेनावर यांनाहि अजून अधिकारपदावर राहूनच काम करूं असें वाटतें. पण राजकीय सत्ताधिकाराच्या तत्त्वज्ञानांत आतां नवीन कल्पना स्फुरत आहे. एका अर्थी, पश्चिमेकडील लोकशाहीला पूर्वेची ही देणगीच होय." – इस्रेलचा पहिला मुख्य प्रधान डेव्हिड बेन गुरिअन यानें आपलें अधिकारपद स्वेच्छेनें सोडून दिलें याचा उल्लेख करून, या वृत्तपत्रानें गुरिअनचें पुढील अर्थाचें वचन उद्धृत केलें आहे : "धन्य तो देश कीं ज्याचा कारभार सुरळित चालून लोकशाहीचीं तत्त्वें इतकीं खोल बिंबलीं आहेत कीं तो देश आपल्या आवडत्या, प्रतिभाशाली नेत्याच्या अधिकारनिवृत्तीचा शांतपणें विचार करूं शकतो!"

— 'टाइम्स ऑफ इंडिया (२१ । १० । ५४)

प्रा. अमृतलाल भ. याज्ञिक

# गुजरातचे लोकप्रिय कादंबरीकार कै. रमणलाल देसाई

नुकतेच सुमारें महिन्यापूर्वी श्री. रमणलाल देसाई स्वर्गवासी झाले. गुजराती कादंबरीकार या नात्यानें त्यांच्याइतकी मान्यता दुसऱ्या कोणालाहि मिळाल्याचें दिसत नाहीं. गुर्जर-साहित्याच्या या क्षेत्रांत लोकप्रियतेच्या दृष्टीनें त्यांचें स्थान अनन्य होतें. श्री. देसाई हे केवळ लोकप्रिय साहित्यिक म्हणूनच नव्हे तर एक खरेखुरे सज्जन गृहस्थ म्हणूनहि प्रसिद्ध होते. सरलता, सौजन्य, गोडवा, नम्रता इत्यादि त्यांचे गुण त्यांच्या लेखनांतहि प्रकट झाले आहेत. काव्य, नाटक, लघुकथा, निबंध, समीक्षा इत्यादि विविध क्षेत्रांत त्यांची प्रतिभा जरी विलास करीत असली तरी त्यांची लोकप्रियता ही त्यांच्या कादंबऱ्यांवरच आधारलेली आहे. त्यांच्या सुमारें तीस कादंबऱ्या प्रसिद्ध झाल्या असून त्यांतील अनेक हिंदी भाषेंतहि अनुवादित झाल्या आहेत. 'दिव्यचक्षु' या प्रसिद्ध कादंबरीचा मराठी अनुवादहि झाला आहे. 'पूर्णिमा' या दुसऱ्या एका लोकप्रिय कादंबरीचें चलच्चित्रीकरण झालें आहे. श्री. रमणलाल यांची कादंबरी वाचली नाहीं असा गुजराती वाचक मिळणें अत्यंत कठिण आहे.

गुजराती कादंबरीवाङ्मयाचा इतिहास अगदी अलीकडचा, सुमारें शंभर-एक वर्षांचा इतिहास आहे. श्री. नंदशंकर तुलजाशंकर महेता यांच्या १८६८ सालीं प्रसिद्ध झालेल्या 'करण घेलो' या कादंबरीपासून त्याचा प्रारंभ झाला. श्री. महेता हे एका शाळेचे मुख्याध्यापक होते. आणि "इंग्रजीप्रमाणेंच देशी भाषांतूनहि कादंबऱ्या लिहिल्या गेल्यास उत्तम." ह्या तत्कालीन रसेल नांवाच्या एक शिक्षणखात्यांतील अधिकाऱ्याच्या सूचनेचा अंमल करण्याच्या हेतूनें त्यांनीं ही ऐतिहासिक कादंबरी लिहिली. त्यानंतर गुर्जर-साहित्याचें हें दालन पुष्कळच संपन्न झालें आहे. तथापि प्रथम श्रेणीचे कादंबरीकार म्हणून आजपर्यंत केवळ तीनच नांवें घेतलीं जातात: "सरस्वतीचंद्र"चे लेखक श्री. गोवर्धनराम त्रिपाठी, श्री. कन्हैयालाल मुनशी आणि श्री. रमणलाल देसाई. 'सरस्वतीचंद्र' ही एक विद्वद्‌भोग्य कृति आहे; उच्च अभिरुचीच्या रसिक वाचकालाच तिचा आस्वाद घेतां येणें शक्य आहे. विविध सामाजिक, राजकीय, सांस्कृतिक, धार्मिक इत्यादि प्रवाहांची समीक्षा करून नव्या युगदर्शी भावनांना कादंबरीच्या रूपानें मूर्त करणारा तो एक कोशच होय असें म्हणतां येईल. म्हणूनच श्री. आनंदशंकर ध्रुव यांनीं त्याचा "पुराण" या संज्ञेनें उल्लेख केला आहे. श्री. मुनशी हे देखील एक प्रतिभावान् कादंबरीकार म्हणून गुर्जरसाहित्यांत प्रसिद्ध आहेत. परंतु त्यांच्या बहुतेक कादंबऱ्या ऐतिहासिक आहेत. आधुनिक आशा-आकांक्षांचें प्रतिबिंब भूतकाळांत पहाण्याचा किंवा आजचे प्रश्न सोडविण्यासाठीं भूतकाळांत प्रेरणा शोधण्याचा प्रयत्न त्यांच्या लेखनांत आहे. आपल्या प्रभावी आणि चमकदार लेखनशैलीनें गतकाळाला पुनश्च जिवंत पात्रांच्या रूपानें पुढें उभें करण्याचें सामर्थ्य श्री. मुनशींच्या लेखणींत आहे. तथापि त्यांचेंहि लेखन अल्पसंख्य रसिक वाचकांपुरतेंच मर्यादित राहिलें आहे.

### गांधीयुगांतील नवजीवनाचें दर्शन

श्री. देसाई हे या दोन्ही कादंबरीकारांपेक्षां अगदीं भिन्न स्वरूपांत पुढें आले आहेत. उच्च साहित्यिक अभिरुचीच्या आणि सामान्य अशा दोन्ही प्रकारच्या वाचकवर्गाला संतोषविण्याचें सामर्थ्य त्यांच्या कादंबऱ्यांत आहे. गांधीयुगाला प्रारंभ झाल्यानंतर गुजरातमध्यें जें नवचैतन्याचें वारें खेळूं लागलें, सामान्य जनतेमध्यें जोम, उत्साह आणि सामर्थ्य यांचा जो प्रत्यय आला, त्याला मूर्तरूप देण्याचा प्रयत्न अनेक साहित्यिकांनीं केला आहे. श्री. सुन्दरम् व श्री. उमाशंकर यांच्या काव्यांत ज्याप्रमाणें या मनोभावना व्यक्त झालेल्या दिसतात, त्याचप्रमाणें श्री. रमणलाल यांच्या कादंबऱ्यांतहि त्यांचें प्रकटीकरण झालेलें दिसतें. श्री. देसाई यांचें कादंबरीलेखन श्री. मुनशीनंतर सुरू झालें. राजकीय कार्यामुळें श्री. मुनशींचें लेखन कमी होऊं लागलें. अशा वेळीं ते

या क्षेत्रांत आले. आणि त्यांनीं आपल्या कादंबऱ्यांच्या द्वारें गुजराती वाचकाला इतकें मोहित व मंत्रमुग्ध करून टाकलें कीं त्यामुळें श्री. मुनशींची उणीव फारशी भासलीच नाहीं. श्री. देसाई यांच्या लोकप्रियतेचीं कारणें त्यांच्या सर्जनकौशल्यांत आणि तत्कालीन समाजांतील विविध भावनांचें चित्रण करण्याच्या त्यांच्या सामर्थ्यांत सांपडतात. त्यांच्या ठिकाणीं गोवर्धनरामची युगविधायक दृष्टि नव्हती हें खरें आहे. तथापि गांधीयुगांतील गुजरातच्या नवजीवनाचें त्यांच्या कादंबऱ्यांतून सामान्य वाचकाला असें कांहीं स्पष्ट, सुंदर आणि भावपूर्ण दर्शन घडलें कीं त्यामुळें त्यांच्याविषयीं निर्माण झालेली आत्मीयता त्याला गोवर्धराम वा मुनशी यांच्याबद्दल कधींच वाटली नाहीं. सामान्य माणसाच्या आशा-आकांक्षांचें यथार्थ आकलन आणि त्यांचा अत्यंत रसयुक्त परिपोष करण्याची कला श्री. देसाईंना साधली होती. त्यांची लोकप्रियता लोकांना रुचणारें लेखन कलात्मक रीतीनें केल्यानें स्वाभाविकपणें प्राप्त होणाऱ्या लोकप्रियतेसारखी नव्हती. केवळ लोकरंजन करणारें त्यांचें लेखन नव्हतें. नवे संस्कारयुक्त भाव प्रकट करून आनंद देण्याचें सामर्थ्य त्यांत होतें. थोडयाबहुत प्रमाणांत का होईना त्यांच्या लेखनाविषयीं विचार करतांना महाकवि प्रेमानंदाच्या लोकप्रियतेचें स्मरण झाल्यावांचून रहात नाहीं. दोहोंची तुलना करण्याचा येथें हेतु नाहीं. आपल्या एका कादंबरीच्या प्रस्तावनेंत श्री. रमणलाल लिहितात : "गुजरातच्या सुंदर आणि सामर्थ्ययुक्त जीवनाचें प्रतिबिंब आपल्या लेखनांत दिसावें आणि त्यायोगें त्या जीवनाला थोडयाबहुत अंशानें प्रेरणा लाभावी अशी प्रत्येक साहित्यिकाची मनीषा असणें स्वाभाविक आहे. मी मात्र त्यांच्याच पंक्तींत बसून असाच उद्देश बाळगला आहे असें जाहीर करण्याचें धाडस करूं शकत नाहीं. नवजीवनाची प्रेरणा देण्याचें सामर्थ्य माझ्या ठिकाणीं नाहीं हें मला मान्य आहे. मला एवढेंच म्हणावयाचें आहे कीं नव्या गुजरातचा मी पक्षपाती आहे. आणि त्यामुळें मला दिसणाऱ्या त्याच्या सौंदर्याचें अंशतः का होईना पण चित्रण करणें मला अत्यंत आवडतें. या माझ्या वृत्तीचा परिणाम म्हणजेच माझ्या कादंबऱ्या होत. अलबत्, गुजराती जीवन हें माझ्या आवडीचें जीवन आहे. त्यांत होणारे फेरबदल अवलोकन केल्यानें मला आनंद होतो. त्यांतील जुनीं वा नवीं अंगोपांगें माझ्या लेखनांत स्पर्शिलीं जाणें मला आल्हाददायक वाटतें. गुर्जर-जीवनाविषयीं जिव्हाळा व्यक्त करण्याच्या माझ्या लहानमोठ्या प्रयत्नांतूनच माझ्या कादंबऱ्या निर्माण झाल्या."

अशा प्रकारें गांधीयुगांतील नवजीवनाचें दिग्दर्शन करण्याची इच्छा हीच श्री. देसाईंच्या कादंबऱ्यांतील प्रेरकशक्ति आहे. स्वातंत्र्यप्राप्तीनंतर देखील या बदलत्या जीवनावर त्यांचें लक्ष केंद्रित झालेलें होतेंच आणि त्यांच्या लेखनांत तें प्रकटहि झालेलें आहे. वास्तविकपणें, नित्याचा जीवनक्रम त्यांना जसा दिसला आणि त्यांत जेथें वैशिष्ट्यपूर्ण स्थानें आढळलीं त्यांचें कलावंताच्या तटस्थ भूमिकेवरून त्यांनीं आपल्या कादंबऱ्यांतून आलेखन करण्याचा प्रयत्न केला असें म्हणणेंच अधिक योग्य होईल. मात्र शेवटीं शेवटीं ही तटस्थता कायम राहिलेली दिसत नाहीं. 'दिव्यचक्षु', 'ग्रामलक्ष्मी' ह्या केवळ उत्तम कादंबऱ्याच नव्हेत तर गांधीयुगाचीं तीं सुंदर चित्रें आहेत. त्यांत सत्याग्रह, अहिंसा, अस्पृश्योद्धार, दरिद्रनारायणसेवा, हिंदु-मुसलमान-ऐक्य सर्वधर्मांविषयीं पूज्यबुद्धि इत्यादि गांधी-तत्त्वज्ञानाचीं विविध अंगोपांगें, त्याचप्रमाणें मिरवणुकी, प्रभातफेऱ्या ध्वजवंदन, लाठीमार, तुरुंगवास, ग्रामसफाई इत्यादि इतर तपशीलहि आढळतात. आणि या सर्वांच्या भोंवतीं आढळणारी उत्साही व ध्येयनिष्ठ तरुणमंडळी, त्यांचीं स्वप्नें, जोम, तळमळपणा, स्नेह, शौर्य, त्याग इत्यादींचें रसभरित वर्णन श्री. रमणलाल करतात. विशेषतः या सर्व पार्श्वभूमीवर मुग्ध प्रणयाचें आलेखन करतांना त्यांचें खरें चातुर्य प्रकट होतें. त्यांच्या लोकप्रियतेंत या चातुर्याला बरेंच मोठें श्रेय द्यावें लागेलसें वाटतें. तात्पर्य, तत्कालीन जीवनाचें सुंदर चित्रण श्री. रमणलाल यांच्या कादंबऱ्यांतून झालेलें आहे. आणि गुजरातच्या सामाजिक इतिहासाचें उत्कृष्ट प्रतिबिंब म्हणूनहि त्यांना महत्त्वाचें स्थान मिळाल्यावाचून रहाणार नाहीं.

सामान्यतः गांधीयुगाचे कादंबरीकार असें रमणलालजींना म्हणता येईल. गांधीजींच्या अहिंसेचें त्यांना इतकें आकर्षण आहे कीं त्यामुळें कांहीं वेळां तटस्थ कलावंताची भूमिका जाऊन ते अहिंसाभक्त म्हणून दिसूं लागतात. उदा०, "भारेलो अग्नि" या त्यांच्या










# गुजरातचे लोकप्रिय कादंबरीकार कै. रमणलाल देसाई

एका प्रसिद्ध कादंबरीचा १८५७ सालचें बंड हा कथाविषय आहे. तथापि या घटनेचा स्वातंत्र्ययुद्ध म्हणून उल्लेख करून त्यांनीं त्यांत अहिंसेचें आरोपण करण्याचा केलेला प्रयत्न पाहिला म्हणजे त्यांची ही भक्तिपरायणता ध्यानांत आल्यावाचून रहात नाहीं. त्याचप्रमाणें 'ठग' नांवाच्या एका विषयसूचक कादंबरींत त्यांनीं ठगांना देशप्रेमानें प्रेरित झालेले अहिंसक बनवून टाकलें आहे. तथापि अहिंसेव्यतिरिक्त गांधींच्या इतर विचारांचा त्यांच्यावर विशेष पगडा असावासें दिसत नाहीं. कडक नियमपालन करून एक प्रकारचें तपस्वी जीवन जगणारांची त्यांनीं टरहि उडविली आहे. याशिवाय साम्यवादाचाहि पुढें पुढें त्यांच्यावर खोलवर परिणाम झाला असावासें दिसतें. चोरी, लूटमार, खून इत्यादि गुन्हे हे सर्व विकृत अर्थव्यवस्थेचेच परिपाक होत ही त्यांची ठाम समजूत असावी असें त्यांच्या अनेक कादंबऱ्यांवरून म्हणतां येतें. थोडक्यांत सांगावयाचें म्हणजे गांधीजींची अहिंसा आणि साम्यवादाची आर्थिक नीति या दोहोंवरहि त्यांची श्रद्धा आहे. आणि या दोहोंना एकत्र गुंफण्याचा त्यांच्या कादंबऱ्यांत प्रयत्न आहे. हा प्रयत्न करतांना त्यांनीं कलात्मक तटस्थता जोंवर कायम ठेवली तोंवर त्यायोगें त्यांच्या कृतींमध्यें कसलीहि हानि होऊं शकली नाहीं. परंतु उत्तरावस्थेंत मात्र त्यांचा विशिष्ट मतांविषयींचा आग्रह वाढत गेला आणि त्यामुळें त्यांच्या कलेची बरीच हानि होऊं लागली असें म्हणतां येईल.

### अद्‌भुत, शृंगार आणि हास्य

यामुळें श्री. रमणलाल यांच्या लोकप्रियतेचा वा यशस्वितेचा विचार करतांना वास्तवतेपेक्षां त्यांच्या रचनाकौशल्यालाच अधिक महत्त्व देणें जरूर आहे. कथानक कोठेंहि न अडतां सतत प्रवाही कसें राहिलें पाहिजे हें श्री. रमणलाल उत्तम जाणतात. यामुळें त्यांच्या कादंबऱ्यांतून उपकथानकें, मोठमोठे चिंतनात्मक परिच्छेद वा अशाच प्रकारच्या अन्य गोष्टींचे परिच्छेद आढळत नाहींत. एकामागून एक दृश्यें डोळ्यापुढून जात राहिल्यानें आपण जणूं एकादा उत्तम चित्रपटच पहात आहोंत या भावनेनें वाचक तल्लीन होऊन जातो. पात्रालेखन, संवादचातुर्य, बहारीचीं वर्णनें, भाषामाधुर्य इत्यादि गुण त्यांच्या कादंबऱ्यांतून उत्कटतेनें प्रकट झाले आहेत; आणि या गुणांना रमणलाल यांच्या सर्जनात्मक कल्पनाशक्तीची जोड मिळाली आहे. यामुळें विविध प्रसंगांची योग्य व कलात्मक रचना सहज होऊन जाते; आणि ही रचना करतांना त्यांना कसलेहि श्रम पडत नसावेत असेंच तिचें स्वरूप दिसतें. यामुळें सामान्य वाचक इतक्या उत्साहानें आणि तन्मयतेनें कथा वाचीत जातो कीं तिच्यांतील तर्कशुद्धता, संगति वा प्रमाणमान याकडे त्याचें फारसें लक्षहि जाऊं शकत नाहीं. कथानकांतील रसपरिपोषहि ते उत्तम करूं शकतात. त्यांच्या कादंबऱ्यांतून मुख्यत्वें अद्‌भुत, शृंगार आणि हास्य हे रस आढळतात. कथानक यशस्वी होण्याच्या दृष्टीनें या रसांना बरेंच महत्त्व आहे. विशेषतः कथानकांत अद्‌भुत अंश आणण्यांत त्यांना खास समाधान मिळत असावें असें वाटतें. वेषपालट, अपघात, आग, बुडून मरणें, खून, भूमिगत जीवन इत्यादि त्यांच्या कथानकांतील अगदीं नित्याच्या बाबी होत. यामुळें अनेकदां आपण एकादी रहस्यकथाच वाचीत आहोंत कीं काय असाहि भास होतो. या प्रसंगांमुळें कथानक खुलतें आणि वाचकाचें कुतूहल जागृत होतें; आणि कथानकांतील दोष दृष्टीआड होतात. त्यांतील तर्कसंगतीच्या वा संभाव्यतेच्या अभावाकडे त्याचें लक्ष जात नाहीं.

तथापि प्रणयाच्या मोहक वर्णनांत रमणलाल यांची प्रतिभा खरी खुलते आणि वाचकास मंत्रमुग्ध करून टाकते असेंच म्हणावें लागेल. "हृदयनाथ" मध्यें व्यायामाचा प्रश्न, "पूर्णिमा" मध्यें वेश्यांचें जीवन, "दिव्यचक्षू"त सत्याग्रह व अहिंसा, "भारेलो अग्नि" मध्यें १८५७ सालचें बंड, "ठग", "कोकिला"– मध्यें दांपत्यजीवन, "ग्रामलक्ष्मी"त ग्रामोद्धाराचा प्रश्न, "सौंदर्य ज्योत" मध्यें दारिद्र्याचा प्रश्न इत्यादि विविध प्रश्न त्यांच्या कादंबऱ्यांतून हाताळण्यांत आले आहेत. त्या सर्व प्रश्नकथा आहेत. तथापि प्रत्येक प्रश्नाभोंवती प्रणयाचें गोड जाळें त्यांनीं विणलें आहे. प्रणयानेंच कथानकाचा आरंभ होतो आणि शेवटीं ते प्रणयांतच संपतें. प्रणयाचा त्रिकोण हा बहुधा सर्वत्र येतोच आणि शेवटीं प्रणय सफल व्हावा यासाठीं तिसरी व्यक्ति मोठ्या दिलदारपणें हौतात्म्य पत्करते. प्रणयाबरोबरच निर्दोष हास्यरस हाहि त्यांच्या लेखनाचें एक महत्त्वाचें आकर्षण आहे. कवि, वृत्तपत्रांचे संपादक, तऱ्हेवाईक अंमलदार, पोलिस, केवळ नफ्यातोट्याचाच

विचार करणारे व्यापारी इत्यादि अनेक प्रकारच्या लाक्षणिक पात्रांची एक प्रचंड सृष्टीच त्यांनीं निर्माण केली आहे. त्यांच्या हास्यमिश्रित उपरोधिक शैलीमुळें हीं पात्रें जिवंत आणि उठावदार झालीं आहेत. चुणचुणीत ध्येयवेड्या नायिका, व्यवहार-शून्य वाटणाऱ्या नायकाचें चित्त आकर्षिण्यासाठीं त्याजवर त्या करीत असलेले प्रणयाराधनेचे प्रयोग आणि त्यामुळें नायकाचा उडणारा गोंधळ पहातांना प्रेमांत निर्माण होणारा हास्यरस अप्रतिमच म्हटला पाहिजे. त्याचप्रमाणें अनेक सामाजिक चालीरीती, भ्रामक समजुती व शिष्टसंमत व्यवहार यासंबंधीं रमणलाल यांनीं केलेली विनोदी व उपहासगर्भ टीका, त्यांच्या मूळ कथानकांत तिला महत्त्वाचें स्थान नसूनहि, सर्वांच्या तोंडीं झाली आहे. त्यांच्या कादंबऱ्यांचें स्वरूप वर्णनात्मक नसून दर्शनात्मक वा नाट्यात्मक आहे. प्रसंग वा स्वभावपरिपोष वर्णनाऐवजीं चटकदार संवादद्वाराच ते करतात. मनोरंजक लेखनशैली आणि साधी व प्रासादिक भाषा यामुळें वाचकाच्या मनाची ते चटकन् पकड घेऊं शकतात.

## ' सुंदर मुखावर पांढरा डाग ! '

तथापि ज्या गुणांमुळें रमणलाल लोकप्रिय झाले आणि कादंबरीकार म्हणून मोठी प्रतिष्ठा मिळवूं शकले त्यांतच त्यांच्या मर्यादाहि समावलेल्या आहेत ही एक विचित्र घटनाच म्हटली पाहिजे. कथानकाची योजना आखतांना त्यांची कल्पनाशक्ति अत्यंत सहायभूत होते खरी ! परंतु तिच्यामुळेंच प्रसंगांची संगति वा संभाव्यता यांजकडे अनेक वेळां दुर्लक्ष होतांनाहि आढळतें. योग्य संकलनाच्या अभावीं कथानक बेदरकारपणें पुढें जात असलेलें दिसतें आणि रसिक वाचकाची निराशा होऊं लागते. ' जयंत ', ' कोकिला ' वा ' भारेलो अग्नि ' हीं अशा प्रकारच्या असंभाव्यतेचीं उत्तम उदाहरणें म्हणून नमूद करतां येण्यासारखीं आहेत. कांहीं वेळां तर हा दोष इतक्या व्यापक स्वरूपांत आढळतो कीं रमणलाल यांचें कथालेखनांतील हें एक तंत्रच नव्हे ना, असाहि संशय आल्यावांचून रहात नाहीं. " हा दोष म्हणजे एकाद्या सुंदर मुखावर पांढरा कोडाचा डाग असावा अशा स्वरूपाचा असून त्यामुळें कादंबरीची सर्व शोभा नाहींशी झाल्यासारखी होते " अशा अर्थाची गुजरातचे एक प्रसिद्ध टीकाकार श्री. विश्वनाथ भट्ट यांनीं केलेली टीका अगदीं रास्त वाटते.

श्री. रमणलाल यांच्या लेखनांत त्यांच्या मतांधतेमुळेंहि महत्त्वाचा दोष निर्माण झाला आहे. सर्व गुन्ह्यांचें मूळ आर्थिक विषमता होय अशी त्यांची ठाम समजूत दिसते. अप्रामाणिकपणा, चोरी, लूटमार, खून इत्यादि अनेक गुन्हे हे केवळ दारिद्र्यांतूनच जन्माला आले आहेत असें ते वेळोवेळीं दर्शवितात. ही मतांधता साम्यवादी विचारसरणींतून त्यांच्या ठिकाणीं निर्माण झाली असावी असें त्यांच्या कादंबऱ्यांवरून दिसतें. त्यामुळें त्यांत कलात्मक हानि अनेकवार झाली आहे. कारण काव्यगत न्यायाच्या रचनेंतून मिळणारा कलानंद त्यांत मिळूं शकत नाहीं. व्यावहारिक दृष्टीनेंहि त्यांचा आग्रह योग्य वाटत नाहीं. सारे श्रीमंत हे कांहीं सद्गुणांचे पुतळे नव्हत. किंवा प्रामाणिकपणा वा चारित्र्य याविषयींचा आग्रह गरिबांच्या ठिकाणीं मुळींच आढळत नाहीं असेंहि नाहीं. तथापि हा विचार क्षणभर बाजूस ठेवला आणि दारिद्र्य हीच सर्व दुर्गुणांची जननी होय हें रमणलाल यांचें म्हणणें मान्य केलें तरी देखील त्यांची भूमिका समर्थनीय ठरूं शकत नाहीं. दारिद्र्यामुळें घडणाऱ्या गुन्ह्यांबद्दल सहानुभूति निर्माण होईल; आदर नव्हे. गुन्ह्यांतील गुन्हा म्हणून असणारा दोष त्यामुळें कसा मिटणार ? रमणलाल यांच्या कादंबऱ्यांतून या गुन्ह्यांचें मूळ दारिद्र्य होय असा खुलासा केल्यानें गुन्हेगार जणूं आदरणीय बनतो अशा प्रकारचें चित्रण आढळतें. ते एके ठिकाणीं म्हणतात, " एकाद्याच्या अंगीं गुण आढळला तर तद्विषयक जन्मप्राप्त संस्कारांचा विकास होण्यासाठीं अनुकूल वातावरण त्याला मिळालें असलें पाहिजे असें समजावें. उलट वाईट कार्य करणारा दिसल्यास त्याचे त्याबाबतचे जन्मप्राप्त संस्कार वाढतील अशा परिस्थितींतच त्याचें आयुष्य गेलें असलें पाहिजे असें म्हणावें लागतें. गटारांत लोळणारा मद्यपी वा कैदेंत पडलेला लुटारू यांच्या स्थानीं आपण नाहीं याचें कारण आपण नसून परिस्थितीच त्याबाबत खरी जबाबदार आहे. ही परिस्थिति बदलल्यास अशा प्रकारचा स्थानविनिमय होण्यास फारसा अवधि लागेल असें नाहीं. " आर्थिक समानता प्रस्थापित झाल्यास सगळ्याच गुणांचा विकास होईल. सर्व दुर्गुण दारिद्र्यामुळेंच निर्माण होतात, म्हणून दुर्गुणी हा इतरांप्रमाणेंच आदरणीय म्हटला

पाहिजे असा सूर त्यांच्या लेखनांत अनेक ठिकाणीं आढळतो आणि उत्तरावस्थेंत त्यांचा या मताबद्दलचा आग्रह कितीतरी वाढला होता. गांधींची अहिंसा आणि साम्यवादाची ही विचारसरणी या दोन्हींचें त्यांना अत्यंत मोठें आकर्षण होतें. अहिंसेनें साम्यवादाचा स्वीकार केला तर जगांतील सर्वच दोष नष्ट होतील असें त्यांना वाटत असावेसें दिसतें. त्यांच्या कादंबऱ्यांवरून हें अनुमान निघाल्यावांचून रहात नाहीं. आरंभींची त्यांची तटस्थता पुढें पुढें या आग्रही वृत्तीमुळें नाहींशी झाली; उलट, या मताचें प्रतिपादन करण्यासाठीं कादंबरीचा ते साधन म्हणून उपयोग करीत आहेत कीं काय अशी शंका येण्यासारखें त्यांचें लेखन होऊं लागलें. त्यामुळें त्यांतील कलात्मकतेला उतरती कळा लागल्याचें दिसतें. नाहींतर गोळीवाचूनचें पिस्तूल दाखवून आपला कार्यभाग साधूं पहाणारा "सौंदर्यज्योत" मधील नायक त्यांनीं निर्माण केला नसता असें वाटतें. हा गांधीवादी युवक आहे, गिरणीचा मालक आहे आणि कामगारांसमवेत तो आपल्या बंगल्यांत रहात आहे. यांत आर्थिक प्रश्नाचा उकल होतो असा दावाहि त्यांनीं करणें शक्य नव्हतें. मतांधता कलेच्या नाशास कशी कारणीभूत होते याचा एक उत्कृष्ट पुरावा म्हणजे रमणलाल यांच्या उत्तरायुष्यांतील कादंबऱ्या हा होय.

श्री. रमणलाल यांच्यासारखा श्रेष्ठ कलावंत अशा प्रकारें कां लिहूं लागला असा प्रश्न अनेकदां मनांत आल्यावांचून रहात नाहीं. कलेची ही हानि त्यांच्या ध्यानांत आली नसेल काय? कादंबरीलेखनाला या देशांतील खुरटलेलें जीवन व सामाजिक वातावरण अनुकूल नाहीं याबद्दल ते तक्रार करतात. एके ठिकाणीं ते लिहितात: "गुजरातमध्यें सामाजिक कादंबरी लिहिणाराला एक फारच मोठी अडचण आहे. युरोपच्या आणि गुजरातच्या सामाजिक जीवनांत फारच मोठा फरक आहे. युरोपांत जें संभवतें तें येथें मुळींच संभवत नाहीं. 'धवलगिरि' हें हिमालयाचेंच एक शिखर आहे. परंतु एखादा युरोपियन गृहस्थ तेथें चढून जाण्याची धडपड करीत आहे हें जसें संभवनीय वाटतें तसें गुजरातच्या एखाद्या मगनलालच्या बाबतींत मुळींच वाटत नाहीं. जर्मन युद्ध नुकतेंच संपलें. पण गुजरातमधील एखादा करुणाशंकर सैनिकांची तुकडी घेऊन रणांगणावर गेला ही कल्पना करणें फारसें जमत नाहीं. उत्तरध्रुवाकडे कॅप्टन स्कॉट जाऊं शकतो. पण एखादा जोरावरसिंग वा बलवीरसिंग तेथें पोहोंचला आहे ही कल्पना देखील फारशी सोपी नाहीं." असल्या संकुचित व प्रगतीचा मार्ग रोखणाऱ्या वातावरणाला कंटाळूनच त्यांनीं कदाचित् साम्यवादाकडे लक्ष वळविलें असावें. परिस्थितीच माणसाला घडविते, आर्थिक परिस्थिति बदलल्यावांचून जीवन समृद्ध होणें अशक्य आहे ही कल्पना त्यांना तेथें मिळाली. आणि तिनें त्यांच्या संवेदनाशील मनावर कायमची पकड बसवली ते लिहितात: "जिथें पोट भरूं शकत नाहीं तिथें पाप, लांचलुचपत, लबाडी व अनीति.... उत्पादनसाधनें सर्व जनतेच्या मालकीचीं झालीं तर महेरु (कथानकांतील एक पात्र) चोर बनणार नाहीं, साधु ढोंगी होणार नाहींत किंवा पाटील-तलाठी लांचलुचपत घेणार नाहींत. ... पापाचें मूळ मालकी हेंच होय... गुन्हा संपत्तींतूनच जन्मतो." या विचारांची तपासणी करण्याचें हें स्थळ नव्हे. तथापि तद्विषयक आंतरिक स्वरूपाच्या आग्रही वृत्तीमुळें त्यांच्या कलेचें मात्र नुकसान झालें आहे यांत संशय नाहीं.

### दोषांची जाणीव

श्री. रमणलाल यांच्या लेखनांतील आणखी एक दोष म्हणजे त्यांच्या कादंबऱ्यांतील वातावरणाला निश्चित वा मूर्त स्वरूप अनेक वेळां प्राप्त होत नाहीं हा होय. त्यामुळें परिणामकारकता कित्येकदां केवळ तात्पुरत्या स्वरूपाचीच असते. उदा०—"भारेलो अग्नि"-मध्यें रशियांतील युद्ध आणलें आहे. तथापि त्याला अनुकूल वातावरणाचा पूर्ण अभाव आहे. त्यांच्या लेखनांत शहरांचीं नांवें, वर्ष, स्थानचित्रें क्वचितच आढळतात. कथानकाची पार्श्वभूमि बहुधा अस्पष्टच रहाते. सर्व कांहीं हवेंत चाललें आहे असा भास होतो आणि रसहानि होते. रचनेंतहि विविधतेचा अभाव दिसतो. बहुतेक कादंबऱ्या एका विवक्षित सांच्याच्याच आहेत. तंत्रहि एक प्रकारें बसून गेल्यासारखें वाटतें. एखादा भावनाशील तरुण असायचा, त्याच्यावर प्रेम करणारी नायिका असायची. आणि या प्रणयाभोंवतीं ग्रामोद्धार, अहिंसा, सत्याग्रह, वेश्याव्यवसाय इत्यादि प्रश्नांचे धागेदोरे गुंफलेले असायचे. त्यांतच नंतर भूमिगत पात्रें, अद्भुत घटना इत्यादींची योजना व्हावयाची. यामुळें एकदोन कादंबऱ्या वाचल्यानंतर चाणाक्ष वाचकाला कोणत्याहि








कादंबरींत काय असण्याचा संभव आहे याचा आरंभींच अंदाज करतां येणें शक्य होतें. रमणलालना देखील हा दोष मान्य असावा असें दिसतें. "वातावरण आणि विषयसंगति ही माझी एक मोठी मर्यादा आहे, हें मी जाणतों. आणि कला त्यामुळें अल्पजीवी ठरण्याचा संभव आहे हें एक सत्य असून तें मला मान्य आहे" – असें त्यांनीं लिहिलें आहे. त्याचप्रमाणें रमणलाल यांच्या कथानकांमध्येंहि कित्येकदां निरनिराळ्या घटनांचे परस्परांशीं असलेले संबंध यांत गोंधळ निर्माण होतो. त्याचप्रमाणें प्रमाणबद्धताहि नाहींशी होते. कांहीं वेळां-तर पूर्वार्ध व उत्तरार्ध यांतील पात्रांच्या वर्णनांतहि मेळ घालणें कठिण होतें. त्यांना याबद्दलहि जाणीव आहे. "लिखाण जसजसें लिहून होतें तसतसें तें छापलें जातें. यामुळें तें सर्व पाहून जे फेरफार करणें आवश्यक असतें ते होऊं शकत नाहींत. मुख्य व उपकथानकांमधील प्रमाणहि राखतां येत नाहीं; ही तांत्रिक सदोषता कलेची हानि करते हें मला माहीत आहे. परंतु तरी देखील मी ती दूर करूं शकत नाहीं." अशा प्रकारचा खुलासाहि त्यांनीं केला आहे. स्वतःचे दोष समजत असूनहि त्यांना कां दूर करतां येऊं नयेत? याच्या मुळाशीं त्यांची लोकप्रियताच होती. रमणलाल याची कादंबरी उत्तम खपते म्हणून प्रकाशकाचा ती लवकर पुरी करण्याविषयीं सारखा लकडा सुरूं असाव-याचा आणि रमणलालना ही मागणी पुरी करावी लागे. लोकप्रियता आणि तिच्यांतून उद्भवलेला व्यापारी दृष्टिकोण यांनीं या श्रेष्ठ कलावंताचें अत्यंत मोठें नुकसान केलें असून कलेचीहि हानि केली आहे, असें एका अर्थी म्हणतां येईल.

कादंबरीकार या नात्यानें श्री. रमणलाल यांचा हा अल्प परिचय होय. गुजराती जीवनावर त्यांचें खरें-खुरें प्रेम होतें. आणि त्यांतील विविध प्रवाह त्यांनीं आपल्या लेखनांत व्यक्त केले आहेत. आपल्या रसाळ व भावपूर्ण साहित्यनिर्मितीच्या योगानें गुजराती समाजाची सेवा केली आहे. आधुनिक गुजरातचें सांस्कृतिक जीवन घडविण्याचें आणि गांधीवादी आदर्शांना तेथें मान्यता प्राप्त करून देण्याचें बरेंच श्रेय श्री. रमणलाल यांच्याकडेच जातें. त्यांच्या निधनानें गुर्जर साहित्याची आणि विशेषतः कादंबरीची अत्यंत मोठी हानि झाली आहे. ही कोण भरून काढणार असा प्रश्न डोळयापुढें येतांच श्री. रमणलाल यांच्या समृद्ध सर्जनाची स्मृति होते आणि स्वाभाविक-पणेंच त्यांना श्रद्धांजलि वाहिली जाते. त्यांच्या निधना-नें एक थोर कलावंत आणि शुभेच्छु सज्जन गुजरात-मधून गेला, हें दुःख मात्र विसरतां विसरणें अशक्य आहे.

---

## नारळीच्या माथ्यावरी–!

नारळीच्या माथ्यावरी
पौर्णिमेचा चंद्र आला
चांदीच्या कीं पेल्यांतुनी
ओती काय दुग्ध-धारा!
नारळीच्या माथ्यावरी
पौर्णिमेचा पूर्ण शशी
खोबऱ्याची वाटी जशी
फेंकियली कीं आकाशीं!
नारळीच्या माथ्यावरी
सुधाकर पौर्णिमेचा
मधु व्हाया नारिकेल
सुधा-सेक करी साचा!
नारळीच्या माथ्यावरी
पौर्णिमेचा चंद्र आला
आलवाल-जल मला
गमे चांदी-रस झाला!
नारळीच्या माथ्यावरी
पौर्णिमेचा चंद्र आला
नारिकेल खाऊनीया
काय फार शुभ्र झाला
नारळीच्या माथ्यावरी
पौर्णिमेचा ये शशांक
वृक्षांमध्यें सम्राटाला
करी काय अभिषेक!
नारळीच्या माथ्यावरी
पौर्णिमेचा तारापति
चांदीच्या कीं तलवारी
हालतांना चमकती!

–विश्वनाथ के. महाबळेश्वरकर







## पुस्तक-परामर्श

**‘ संशोधन-मुक्तावलि ’ – ( सर पहिला ) – लेखकः म. म. वा. वि. मिराशी,** मध्यप्रदेश–संशोधनमंडळ, नागपूर ( १९५४ ).

प्राचीन भारतीय संस्कृतीविषयीं निरतिशय अभिमान बाळगणाऱ्या प्रांतांत महाराष्ट्राची प्रामुख्यानें गणना होऊं शकेल. तथापि या संस्कृतीचा आधुनिक साधनांच्या साहाय्यानें, आधुनिक पद्धतीनें अभ्यास करणाऱ्यांत महाराष्ट्र तितकाच मागासलेला आहे यांतहि शंका नाहीं. याचें कारण म्हणजे या साधनांची चांगली माहिती असलेल्या व त्यांचा शास्त्रीय निरभिमानतेनें अभ्यास करणाऱ्या व्यक्तींना मुंबई व पुणें येथील विश्वविद्यालयांत योग्य तें स्थान अद्याप मिळूं शकत नाहीं; अर्थात् या विश्वविद्यालयांत एकदा चांगला ‘ पुरालेखज्ञ ’ किंवा Epigraphist मानानें राहूं शकेल असें सध्या तरी संभवनीय दिसत नाहीं. आजकालच्या आधुनिक युगांत संस्कृतीचा अभ्यास अत्यंत कांटेतोल रीतीनें करावयाचा तो ‘ पुरालेखां’च्या साहाय्यानेंच करणें शक्य आहे. मूर्तिकला, शिल्पकला इ० संस्कृतीचीं इतर उपांगें, प्राचीन भारतीय इतिहासांत या ‘ पुरालेख-शास्त्रा’वर बऱ्याच अंशीं अवलंबून असलेलीं आढळतात. कारण, या कलांची वाढ व भरभराट निरनिराळ्या काळीं व निरनिराळ्या प्रांतांत कशी झाली, हें या शास्त्राच्या साहाय्यानेंच अनेक प्रसंगीं निर्णीत करतां येतें.

याचा परिणाम असा झाला आहे कीं, महाराष्ट्रांतील जाडे जाडे संस्कृत पंडित प्राचीन भारतीय इतिहास व संस्कृति यांविषयीं वाटेल तीं विधानें भरमसाट पद्धतीनें, सर्वज्ञत्वाचा आव आणून, बेलाशक करतात. अशा प्रकारच्या कित्येक विद्वानांच्या कित्येक विधानांना, महामहोपाध्याय प्रि. वा. वि. मिराशी यांनीं प्रस्तुत ‘ संशोधन–मुक्तावलि ’ या ग्रंथांत सप्रमाण व सयुक्तिक उत्तरें दिलेलीं आहेत. त्यांनीं हाताळलेला विषय मुळांत क्लिष्ट व कंटाळवाणा असला तरी त्यांनीं तो अतिशय सुलभ व मनोरंजक करून टाकला आहे. प्रतिपक्षाचा मतलब शक्य तों त्याच्याच शब्दांत देऊन, नंतर तो किती ‘ अवास्तव ’ आहे, हें पुरालेख व प्राचीन वाङ्मय यांच्या आधारानें दाखवून द्यावयाचें; व तसें करतांना प्रतिपक्षाच्या भरमसाट विधानांनीं किंवा कल्पनांनीं आपला तोल जाऊं न देतां, शांतपणानें, प्रतिपक्षाचा योग्य तो मान ठेवून, मुद्देसूदपणानें त्याच्यावर तितकाच निकराचा हल्ला करून, त्याचा धुव्वा उडवावयाचा, – ही म. म. मिराशी यांची कला आधुनिक विद्वानांना आदर्शभूतच आहे. पण यापेक्षांहि या कलेनें जें साधलें आहे, तें महाराष्ट्राच्या संशोधनाच्या इतिहासांत अधिक महत्त्वाचें ठरेल.

संस्कृत वाङ्मयाचा इतिहास ज्याला लिहावयाचा असेल, त्याला म. म. मिराशी यांच्या ‘ कालिदास ’ ( नवभारत-ग्रंथमाला, नागपूर, १९३४ ) या ग्रंथाप्रमाणें ‘संशोधनमुक्तावलि’ ( मध्यप्रदेश-संशोधन-मंडळ-ग्रंथमाला, क्रमांक ५ ) हा प्रस्तुत ग्रंथहि एक अमोल साधन आहे. या ग्रंथांतील पहिल्या लेखांत, पुष्यमित्र शुंगाविषयीं बरीच माहिती गोळा करून, तत्कालीन इतिहासावर त्यांनीं निःसंशय प्रकाश पाडला आहे. तथापि त्याबरोबर कांहीं चिन्त्य विधानेंहि त्यांत आढळतात. उदा० – पृ. ९-१० वर त्यांनीं शुंगांची राजधानी ‘ पाटलिपुत्र ’ होती, असें म्हटलें आहे. हें नंतरच्या कांहीं शुंग राजांच्या बाबतींत खरें असेल; पण पुष्यमित्र हा अयोध्येला होता व अग्निमित्र हा विदिशेला होता. इतकेंच नव्हे, तर या दोन ठिकाणीं किंवा त्यांच्या जवळ, त्यांच्या वंशजांचेंहि वसतिस्थान असावें, असें दिसून येतें. याविषयीं येथें फारशी चर्चा न करतां, अयोध्येबाबतींत म. म. मिराशी यांनीं उल्लेखिलेल्या ‘सेनापति पुष्यमित्रविषयक अयोध्येच्या शिलालेखा’कडे अंगुलि-निर्देश करतां येईल. याचें भाषान्तर मिराशी यांनीं पृ. १५ वर केलें आहे. त्यांत कांहीं चुका झाल्या आहेत. ‘ पुष्यमित्रस्य षष्ठ ’ म्हणजे पुष्यमित्रापासून त्याचा वंश मोजावयास सुरवात केली असतां, सहावा पुरुष असा अर्थ आहे, हें आम्ही ‘ ॲनाल्स् ऑफ् दि भांडारकर ओरिएंटल रीसर्च इन्स्टिटयूट् ’ च्या एका अंकांत दाखवून दिलें आहे. ‘ धर्मराजा ’ ही पदवी इ. स. च्या पूर्वी व नंतर १–२ शतकांत अनेक राजांनीं घेतली होती; व नंतर याऐवजीं ‘ धर्ममहाराज ’ ही पदवी अधिक रूढ झाली. अर्थात्, “ धर्मराज्ञः पितुः फल्गुदेवस्य ” याचें ‘ धर्मराजाच्या पित्याचें म्हणजे फल्गुदेवाचे ” असें म. म. मिराशी यांनीं केलेलें भाषान्तर अयोग्य








आहे. ( पृ. १५ ). " पाली वाङ्मयावरून बुद्धकालीन 'अवन्तिदक्षिणापथ' या देशांत विदर्भाचा अन्तर्भाव होत असे असें दिसतें " असें म. म. मिराशी यांनीं ( पृ. २३ वर ) म्हटलें आहे. तथापि प्रत्यक्ष पाली वाङ्मयांतील मूळ उल्लेखांवरून असें मुळींच दिसून येत नाहीं. अन्यत्र ( पृ. ३१ ), '[ व ] सुमित्रानें सिन्धु-नदीच्या दक्षिण तीरावर यवनसेनेचा पराभव केला ' या पुष्यमित्राच्या पत्रांतील वाक्याचा उल्लेख करून, महो० मिराशी यांनीं व्हिन्सेंट् स्मिथ्च्या मताचा स्वीकार करून ही सिन्धु प्रख्यात सिन्धु-नद नसून, यमुना-नदीला मिळणारी सिन्धु असावी, असें म्हटलें आहे. पाटलिपुत्रांतील सर्वसामान्य माहितगाराला 'सिन्धु'चा उल्लेख केला असतांना सिन्धु-नदाचीच कल्पना येत असली पाहिजे, याबद्दल आम्हाला तिळमात्र शङ्का वाटत नाहीं. असें मानलें, तर शुंगांचें साम्राज्य बरेंच मोठें होतें, असें मानावें लागेल. अत एव हिंदुस्थानच्या इतिहासांतील वैभवाचे कालखंड वैभवशून्य दाखविण्याचा अनेक प्रसंगीं पद्धतशीर प्रयत्न करणाऱ्या डॉ. व्हिन्सेंट स्मिथ् व तत्सम पाश्चात्य इतिहासकारांना ही कल्पना मान्य होण्यासारखी नव्हती. 'सिंधु-नदीच्या पलीकडे यवनसेनेला पिटाळून लावलें' यासारख्या या अभिमानानें लिहिलेल्या वाक्याचा मथितार्थ 'यमुनेला मिळणाऱ्या सिंधुपलीकडे घालविलें' असा करून या लेखकानीं खरोखरच 'अर्थान्तर-न्यास' साधला आहे. ही यवनसेनेला सिंधुपार पिटाळण्याची कल्पना केवळ 'कवि-कल्पना' नसून, ऐतिहासिक सत्य होतें, असें आमचें मत आहे. तथापि येथें एवढें निर्दिष्ट करणें जरूर आहे कीं, आमच्यांतील मोठमोठाले विद्वान्‌हि, डॉ. स्मिथ्-सारख्यांनीं उघड उघड साम्राज्यवादी दृष्टिकोणांतून लिहिलेल्या इतिहासांत मांडलेल्या अनेक प्रमेयांना बळी पडलेले दिसतात.

डॉ. स्मिथ्‌सारख्यांना ॲलेक्झँडर् दि ग्रेट्च्या स्वारीइतकी मोठी अशी हिंदुस्थानच्या इतिहासांत कोणतीच घटना दिसली नाहीं. त्याचा मोठेपणा वाढविण्याकरितां त्यांनीं आपल्या ग्रंथराजाची जवळजवळ एक-चतुर्थांश पृष्ठें कारणीं लाविलीं आहेत. त्याचप्रमाणें जेथें कांहीं निश्चित माहिती मिळत नाहीं किंवा अपुरी माहिती मिळते, अशा बाबतींत आमच्या देशांतील साम्राज्यांचा व सम्राटांचा क्षुद्रपणा दाखवावयाचा उलट, केवळ कल्पनेच्या आधारावर रोमन साम्राज्याचा विस्तार इ० कल्पनातीत वाढवावयाचा, असाहि त्यांनीं सशास्त्र, पद्धतशीर व त्रिनदिक्कत प्रयत्न केला. कुषाण साम्राज्याविषयीं व सम्राटांविषयीं हें 'क्षुद्रीकरण' त्यांनीं कसें साधलें, या विषयीं 'भांडारकर प्राच्यविद्यामंदिरा'च्या वार्षिकांत क्रमानें प्रसिद्ध होत असलेल्या एका मोठ्या लेखांत आम्ही दाखविलें आहे. तशीच गोष्ट वस्तुतः अशोकोत्तरकालीन मौर्य साम्राज्याविषयींहि आहे. कांहीं एक पुरावा नसतांना, अशोकाचें साम्राज्य त्याच्यानंतर लगेच शकलें होऊन, विभागलें जाऊन, ते नाममात्र राहिलें, असें डॉ. व्हिन्सेन्ट् स्मिथ्नीं प्रथम मांडलें; व हें सारें आमच्या विद्वानांच्याहि गळीं उतरविलें. 'मालविकाग्निमित्रां'तील सिंधु-नदीविषयींचा उल्लेख हा प्रख्यात महानदाविषयीं नसून, एका अल्प-प्रसिद्ध सिन्धु नदीविषयीं असल्याची कल्पनाहि याच दृष्टिकोणांतून निघालेली आहे. ही दिसावयाला छोटी पण परिणामानें मोठी बाब असल्यानें याची येथें थोडीफार सविस्तर चर्चा केली आहे.

'कालिदास व अश्वघोष' या शीर्षकाखालीं म. म. मिराशी यांनीं लिहिलेले दोन लेख या संग्रहांत ग्रथित आहेत. या दोन कवींच्या काव्यांत जीं अनेक सादृश्य-स्थळें आढळतात, त्यावरून बौद्ध-धर्म-द्वेष्टे व 'हिंदु' ( ब्राह्मण ) संस्कृतीचे फाजील अभिमानी असलेले आमचे मित्र श्री. अ. ज. करंदीकर यांनीं, आवश्यकता नाहीं अशा बाबतींतहि कालिदासाची तरफदारी केली आहे. ती अशी कीं, व्यास-वाल्मीकी या दोन कवींखेरीज दुसऱ्या कोणापासूनहि कालिदासानें 'उक्तीची उचलेगिरी' केली नाहीं व तो 'फारच सोज्ज्वळ' होता. ( पृ. ४१ ). " आमचा हिंदु कालिदास अश्वघोषासारख्या बौद्ध भिक्षूच्या दाराशीं तिष्ठत होता, ही कल्पना तरी आमच्या विश्व-विद्यालयांतील आचार्यांस करवते कशी ? " असें श्री० करंदीकर सखेद आश्चर्य प्रकट करतात ( पृ. ४४ ). आम्ही सध्या नागार्जुनकोंडयाला म्हणजे प्राचीन श्रीपर्वतांत आहोंत. येथें इ. स. ३ ऱ्या शतकांत इक्ष्वाकु-सम्राट् राज्य करीत होते. त्या सम्राटांचें 'अश्वमेध, अग्निष्टोम, वाजपेय इत्यादि यज्ञ करणारे व ब्राह्मणांना गाई व भूमि देणारे,' असें वर्णन आहे. आणि









अनुक्रमणिका

हें वर्णन कशांत आहे ? तर त्या सम्राटांच्या भगिनींनीं, पत्नींनीं किंवा कन्यांनीं बौद्ध चैत्यांना व विहारांना दानपत्रें दिलीं त्यांत ! या इक्ष्वाकूंच्या पूर्वीच्या सातवाहन राजांच्या कारकीर्दींतहि, राजे लोकांनीं ' हिंदु-धर्म ' ( किंवा 'ब्राह्मणधर्म') स्वीकारून यज्ञयाग करावयाचे, व त्यांच्या गृहिणींनीं किंवा मातांनीं बौद्ध लेण्यांना किंवा भिक्षुसंघांना दान द्यावयाचें, अशीच प्रथा चालू होती असें दिसतें. व हें सारें पुणें, मुंबई, नाशिक, इ० ठिकाणच्या जवळच्या लेण्यांतील शिलालेखांवरून दिसतें. या दोन धर्मांतील लोकांचा एकमेकांविषयीं आदरभाव श्री. करंदीकरांच्या कल्पनेच्या बाहेरचा असल्यामुळें त्यांनीं हे वरील उद्गार काढले आहेत. अर्थात्, ' दिङ्नागानां पथि परिहरन् स्थूलहस्तावलेपान् ' असा कालिदासानें आचार्य दिङ्नागाविषयीं आदरानें उल्लेख केला आहे, असें आम्ही म्हटलें, तर तें श्री. करंदीकरांना कदापि सहन व्हायचें नाहीं किंवा मान्य व्हावयाचें नाहीं. उलट ते आम्हाला ' एकाद्या बौद्ध भिक्षूचा कालिदास इतक्या आदरानें उल्लेख करतो ही कल्पनाच तुम्हाला कशी सहन होते ? म्हणून विचारावयाचे. आमच्या-जवळ असलेल्या प्रश्नाला उत्तर नाहीं. तथापि म म. मिराशी यांच्याजवळ असल्याहि प्रश्नांना भरपूर व मुद्देसूद उत्तरें आहेत, असें त्यांचा ग्रंथ वाचल्यावर लक्षांत येईल.

' मेघदूतांतील रामगिरि' या लेखांत म. म. मिराशी यांनीं बरीच नवीन माहिती दिलेली आहे. ' माल ', ' आम्रकूट ', ' धूम्रेश्वर ' ( किंवा ' धूम्राक्ष ' ) याविषयींची माहिती प्राचीन इतिहासांतील तज्ज्ञांना देखील नवीनच आहे. ही इंग्रजींत प्रसिद्ध झालेली नसावी; निदान माझ्या वाचनांत नाहीं. ही व या ग्रंथांतील इतर जी कांहीं माहिती म. म. मिराशी यांनीं इंग्रजींत प्रसिद्ध केली नसेल, ती सारी माहिती त्यांनीं तशी प्रसिद्ध करावी, अशी प्रस्तुत लेखकाची त्यांना नम्र सूचना आहे.

' कालिदासाचें कुन्तलेश्वरदौत्य ' या लेखांत म. म. मिराशी यांनीं सांगोपांग चर्चा केली असली, तरी वाकाटक राजे हे कधीं काळीं ' कुन्तलेश ' होते कीं नाहीं, या प्रश्नाच्या बाबतींत त्यांचा थोडाफार गोंधळ उडालेला दिसतो. ' कुन्तलदेश ' हा कृष्णाकांठीं होता, हें निर्विवाद आहे. अमरावती ( प्राचीन धान्य-कटक ) येथें सांपडलेल्या एका प्राचीन शिलालेखांत वाकाटकांचा उल्लेख आहे, हेंहि सुप्रसिद्ध आहे.[1] कृष्णातीरावरून वाकाटक राजे उत्तरेकडे गेले, म्हणून कदाचित् त्यांना त्यांच्या मूळदेशावरून ' कुन्तलेश ' म्हणत असावेत; नंतरच्या काळांत नरेन्द्रसेनाच्या मुलीचा एका तत्कालीन कुन्तलेशाशीं विवाह झाला, त्या वेळीं तो भाग त्यांच्या हातून दुसऱ्या वंशाच्या हातांत गेला असावा. या नंतरच्या काळांत ते ' कुन्तलेश ' नसावेत असें मानण्यास आम्हास फारसा प्रत्यवाय वाटत नाहीं

'भवभूतीच्या नाटकांतील कालप्रियनाथ' या लेखांत म. म. मिराशी यांनीं कै. माधवराव व्यं. लेले यांनीं प्रथम सुचविलेलें, व नंतर इतर अनेक विद्वानांनीं मान्य केलेलें, ' कालप्रियनाथ = काल्पी ' हें समीकरण योग्य व भरपूर पुराव्यानिशीं सिद्ध करतां येत असल्याचें दाखवून दिलें आहे. तथापि या लेखांत, व अन्यत्रहि कांहीं ठिकाणीं, ' पूर्व सूरीं'नीं केलेल्या कामगिरीबद्दल त्यांचा संमानपूर्वक यथायोग्य निर्देश करण्यांत आलेला आहे, असें वाटत नाहीं. उलट, ' भवभूतीचें जन्म-स्थान ' या लेखांत तर श्री. मा. व्यं. लेले यांनीं काल-प्रियनाथ याविषयीं सुचविलेला अर्थ आपणास तित-कासा ' ग्राह्य वाटत नाहीं ' ( पृ. ७९ ), असा म. म.

१ — पृ. ७२ वर म. म. मिराशी यांनीं "विख्यातकृष्णवर्णे तैलस्नेहोपलब्धसरलत्वे । कुन्तलविषये नितरां विराजते मल्लिकामोदः ॥ " असा ताम्रपटांतून किंचित् ' दुरुस्त ' केलेला एक श्लोक दिला आहे. आम्ही प्रसिद्ध करीत असलेल्या नागार्जुनकोंडाविषयक मार्ग-दर्शिकेंत असें दाखवून दिलें आहे कीं, नागार्जुनकोंड्याला प्राचीन काळीं श्रीपर्वत, श्रीगिरि, श्रीशैल किंवा श्रीस्थान म्हणत असून येथील मध्यभागीं असलेल्या उच्च शिखरावर, मल्लिकार्जुन किंवा मल्लाया याची पूजा इक्ष्वाकु किंवा श्रीपर्वतीय आन्ध्र सम्राटांच्या वेळेपासून चालत आलेली आहे. ' मल्लिकामोद ' या शब्दाचा एक अर्थ प्रि. महा० मिराशी यांनीं दिला आहे; पण स्थलवाचक दुसरा अर्थ या श्रीपर्वतीय मल्लिकार्जुनाविषयीं आहे, याविषयीं आम्हाला मुळींच शंका नाहीं. अमरावतींतील वाकाटकांच्या उल्लेखाची अशा रीतीनें संगति लावतां येते.

मिराशी यांनीं स्पष्ट कबुली जबाबदिलेला आहे. हा लेख इ. स. १९३५ मध्यें लिहिला गेला; त्यानंतर त्यांना तें समीकरण मान्य होऊन, इ. स. १९४७ मध्यें त्यांनीं बऱ्याच पुराव्यानिशीं तें मत बरोबर असल्याचें सांगितलें. पण तें सांगतांना वर सांगितल्याप्रमाणें पूर्वसूरींची योग्य ती ' प्रशंसा ' झालेली नाहीं. 'भवभूतीचें जन्मस्थान ' या लेखाविषयीं मात्र, संशोधनात्मक लेख सोप्या मराठींत कसा लिहावा याचा हा एक उत्कृष्ट मासला आहे, असें म्हटलें तर ही 'स्तुति' होणार नाहीं, केवळ ' भूतार्थकथन'च होईल. सर्वांगीण माहिती व सूक्ष्म विचारांची धारा ह्या दोन्हीं आपणास या लेखांत दिसून येतात.

' गाथा-सप्तशतीचा काळ ' या लेखांत मात्र माहिती भरपूर प्रमाणांत गोळा केली असली, तरी ज्याप्रमाणें ती प्रत्येक संशोधनपर लेखांत एकमुख ( किंवा ' एकांतिक ' ) व्हावी लागते, त्याप्रमाणें ती येथें झालेली दिसत नाहीं. ' गाथा-सप्तशतीच्या निदान सहा आवृत्त्या झाल्या असल्या पाहिजेत, ' असा वेबरनें केलेला तर्क वस्तुतः निर्मूल असूनहि, म. म. मिराशी यांनीं तो जवळ जवळ प्रमाणभूत मानलेला आहे. तसेंच एका हातानें गोळा केलेला, हा ग्रंथ इ. स. ६ व्या शतकापूर्वी रचलेला असणें शक्य नाहीं याविषयींचा पुरावा, दुसऱ्या हातानें त्यांनीं बाजूला सारला आहे.

' छप्पण्णय ' हें एक ' छप्पन कवींचें मण्डळ ' होतें, असा म. म. मिराशी यांचा तर्क भरपूर पायावर उभारलेला आहे, असें वाटत नाहीं. अर्थात् त्यांनीं दिलेल्या पुराव्याच्या व मांडलेल्या विचारसरणीच्या बाबतींत, त्यांचा तर्क मान्य न करतांहि, आदर बाळगणें हेंच युक्त होईल. एकादा तर्क भरपूर पुराव्यावर प्रतिष्ठित नसला, म्हणजे त्याच्याविषयीं हेटाळणी करावयाची किंवा तुच्छतेनें बोलावयाचें, असा कांहीं असहिष्णु विद्वानांचा शिरस्ता आहे. त्यांनीं हें ध्यानांत ठेवावें कीं, जगाच्या ज्ञानांत प्रगति व्हावयाची असेल, तर थोडयाफार कच्च्या पायावरहि आधारलेले तर्क लोकांपुढें मांडणें, हेंहि अत्यंत आवश्यक आहे याच्या पुढील ' हरिविजय-काव्या 'विषयींचा लेखहि या लेखाप्रमाणेंच प्राकृत भाषेच्या इतिहासाच्या दृष्टीनें बराच महत्त्वाचा आहे.

' शालिवाहन शकाची पूर्वपीठिका ' हा लेख माहितीपूर्ण असूनहि विषयानुरोधी नाहीं, असेंच बऱ्याच वाचकांना वाटेल. याउलट ' शकनृपति श्रीधरवर्म्याचा एरण येथील स्तंभलेख ' या लेखांत, एरण या सुप्रसिद्ध प्राचीन गांवीं सांपडलेल्या एका स्तंभावरील लेखाच्या साहाय्यानें जी चर्चा करण्यांत आली आहे, ती विषयानुवर्ती असल्यानें, त्यांत विद्वत्ता ठासून भरलेली नसली तरी, अधिक मनोरंजक झाली आहे.

' रामगुप्ताच्या चरित्रावर नवीन प्रकाश ' या लेखांत त्यांनीं रामगुप्तावर तितकासा प्रकाश पाडलेला नाहीं, ' कार्तिकेय ' किंवा ' महीपालदेव ' या प्रतीहारराजाच्या बाबतींतच मुख्य प्रकाश पाडलेला आहे, ही गोष्ट, कां कुणास ठाऊक, लेखाचें शीर्षक देतांना म. म. मिराशी विसरलेले दिसतात. अर्थात् त्यामुळें प्रकाशावर कोणतीहि छाया पडत नाहीं हें खास. 'हर्षचरितां'तील एका वाक्यांत, ' चन्द्रगुप्तानें शकपतीचा अलिपुर नांवाच्या गांवीं वध केला ' असें म्हटलें आहे. याबाबतींतील आमचें सविस्तर संशोधन अन्यत्र यथाकाल प्रसिद्ध होईल. येथें आम्ही थोडक्यांत एवढेंच मांडूं इच्छितों कीं, हा शकपति म्हणजे प्रचलित सर्वमान्य ( व एके काळीं आम्हालाहि मान्य असलेल्या) कल्पनेप्रमाणें उज्जयिनीचा शकराजा नसून, उज्जयिनीच्या शकराज्यांचे सम्राट् जे कुषाण राजे त्यांच्यापैकीं हा " शकपति " होता. दुसरें असें कीं, हें अलिपुर ' पंच-नद ' व सिन्धु-नद यांच्या मधील दुआबांतील ' अलिपुर ' नांवानें अद्याप ख्यात असलेलें गांव आहे. अल्-बी-रूनीनें कान्होर किंवा कारूर नांवाच्या गांवाजवळ विक्रमादित्यानें शकराजाचा पराभव केला असें म्हटलें आहे तो गांवहि अलिपुर गांवाच्या जवळ-सुमारें ५० मैलांवर-असल्याचें आढळून येईल.

या लेखसंग्रहांतील सवाच्या शेवटचा ' विद्धशालभञ्जिके'वरील लेख तत्कालीन संस्कृतीवर चांगलाच प्रकाश पाडतो. केवळ तें नाटक वाचून, त्या संस्कृतीविषयीं जी माहिती मुळीच कळणें शक्य नाहीं, ती म. म. मिराशी यांनीं आपल्या दीर्घ व्यासंगानें व शास्त्रीय कल्पनाशक्तीनें आपणाला प्राप्त करून दिली

आहे, याबद्दल प्राच्यविद्याप्रेमी त्यांचें केव्हांहि ऋणी रहातील.

ग्रंथाच्या शेवटीं आपल्या मित्रांच्या आग्रहाला मान्यता देऊन, म. म. मिराशी यांनीं आजवर लिहिलेल्या दीडशेंहून अधिक इंग्रजी लेखांची व मराठींत लिहिलेल्या सत्तर-एक लेखांची सूची दिलेली आहे. ती संशोधकास अत्यंत उपयोगी आहे. म. म. मिराशी यांचे इंग्रजी लेख ज्यांनीं वाचले आहेत, त्यांना त्यांच्या विद्वत्तेविषयीं व लेखनशैलीविषयीं आदर वाटल्याशिवाय रहात नाहीं. महाराष्ट्रांत त्यांच्यापेक्षां तिप्पटीनें लेख लिहिलेले विद्वान नाहींत, असें नाहीं. पण अशांच्या लेखांत, डॉ. दे. रा. भांडारकर, डॉ. अ. स. आळतेकर, म. म. वा. वि. मिराशी यांसारख्या विद्वान् पुरालेखज्ञांच्या लेखांत आढळून येणारे – सर्वांगीण माहिती, समतोल विवेचक बुद्धि व विशेषतः विचारांची व कल्पनांची पद्धतशीर रीतीनें सुव्यवस्थित मांडणी, यांसारखे आवश्यक असणारे गुण मुळींच आढळून येत नाहींत. त्यामुळें त्यांचे लेख रूक्ष व जंत्रीवजा झालेले आढळतात. जगाच्या ज्ञानांत भर पाडण्याच्या दृष्टीनें ते फारच थोडे उपयोगी ठरतात. लेख किती लिहिले यावर विद्वानाची विद्वत्ता ठरत नसून, जगाच्या विचारांत प्रगति करण्याच्या दृष्टीनें कोणत्या विद्वानाची काय कामगिरी आहे, यावरच त्याचें मोठेपण ठरणार आहे. म. म. मिराशी यांनीं लिहिलेल्या लेखांसारखे १०–१५ लेखहि दुसऱ्या अनेक विद्वानांच्या लेख–शतकापेक्षां अधिक योग्यतेचे आहेत, हें निर्विवाद आहे.

— स. का. दीक्षित.

---

**नागपूरचा सांस्कृतिक इतिहास – लेखक : श्री. देवीदास गोविंद लांडगे.** प्रकाशक : मध्यप्रदेश संशोधन मंडळ, नागपूर, ( १९५४ ). पानें १२५ किं. २ रु.

प्रस्तुत पुस्तकांत नागपुर शहराच्या सुमारें गेल्या सव्वाशें दीडशें वर्षांचा इतिहास संक्षिप्तपणें आला आहे. या पुस्तकाचे विषयांच्या अनुरोधानें स्थूल मानानें दोन भाग पडतात. एक भाग मराठ्यांचा नागपूरमध्यें प्रवेश झाल्यापासून इंग्रजांचा अंमल सुरू होईपर्यंतचा राजकीय इतिहासाचा असून तो इतिहास-विषयक जुन्या लिखाणाचा संक्षेपरूप आहे. या भागांत सुप्रसिद्ध मराठे, ब्राह्मण, प्रभु, मुसलमान घराणीं व त्यांतील कर्तृत्ववान् पुरुष यांची त्रोटक माहिती आली आहे. या पुस्तकाचा विषयाच्या दृष्टीनें दुसरा महत्त्वाचा भाग म्हणजे नागपूर शहरांतील निरनिराळ्या सांस्कृतिक अंगांच्या इतिहासाचा होय. यांत नागपूरमध्यें गेल्या १२५ वर्षांत होऊन गेलेले प्रसिद्ध संत, पंडित, कीर्तनकार, गायक-वादकादि कलाकार, यांची संक्षिप्त माहिती दिली आहे. याशिवाय सामाजिक जीवनाचीं जीं विविध अंगें – हिंदु, जैन, खिस्तीमंदिरें, मशिदी, शिक्षण व शिक्षणसंस्था, वाचनालयें, वृत्तपत्रें, नाटकमंडळ्या, उत्सव, चालीरीती, व्यापार–उद्योगधंदे इत्यादींविषयीं अगदीं त्रोटक असें समालोचन केलें आहे. ही सर्व माहिती सादर करण्यापूर्वी लेखकानें ती जशी ग्रंथावरून व लेखांवरून तशीच अनेक वृद्ध, अनुभवी गृहस्थांची गांठ घेऊन परिश्रमपूर्वक गोळा केलेली आहे, हा या पुस्तकाचा एक विशेष होय. सबंध पुस्तकांत माहिती अत्यंत परिश्रमपूर्वक गोळा केल्याचें दिसून येतें. पण तिच्या मांडणीचें स्वरूप त्रोटक, कांहीं ठिकाणीं तर फार त्रुटित आणि संकीर्ण वाटतें. कांहीं अंगांची माहिती ( – उदा० – शिक्षण, वाचनालयें, व्यापार – ) तर जंत्रीवजा व अगदीं अपुरी वाटते. तिचा अन्वयावत् परिस्थितीशीं सांधा जोडलेला नसल्यामुळें नागपूरचें सांस्कृतिक चित्र अपुरें वाटतें. लेखकानें आपल्या प्रास्ताविक ' हृद्गता'मध्यें यापेक्षां विस्तृत इतिहासाची सामग्री आपणांजवळ लिहून तयार असल्याचें प्रकट केलें आहे. प्रस्तुत छोट्या इतिहासामुळें वाचकाची त्या आगामी विस्तृत इतिहासाबद्दलची उत्सुकता वाटेल यांत शंका नाहीं.

हिंदूंच्या मंदिरांची माहिती देतांना नागपुरांत असलेल्या गोसाव्यांच्या मठांचा उल्लेख लेखकानें करावयास हवा होता. अठराव्या शतकांतील नागपूरच्या इतिहासांत गोसाव्यांचा बराच हात असे, असें म्हणतात.

— वि. म. बेडेकर

---

**अखेरी साधली** — लेखिका : सौ. उमा फडणीस; प्रकाशिका : सौ. द्वारकाबाई शिरास, धरमपेठ, नागपूर १. (१९५४). पानें ६७. किं. १ रु.

प्रस्तुत छोट्या कादंबरीची किंवा दीर्घ कथेची नायिका लता ही एक व्यक्तित्वाच्या विकासाकरितां धडपडणारी स्त्री आहे. तिचा नवरा मनोहर आपल्या पुरुषी नीतीच्या कल्पनेमुळें तिचें व्यक्तित्व दडपून टाकण्याचा प्रयत्न करतो, घरांत एक दुसऱ्याची विवाहित स्त्री आणून ठेवतो. या अन्यायी, अपमानकारक परिस्थितीला लता धैर्यानें, संयमानें, कसें तोंड देते व आपल्या उन्नत व्यक्तित्वानें परिस्थितीवर व सर्व व्यक्तींवर कशी मात करते, ह्याचें लेखिकेनें मोठ्या मार्मिकपणें चित्रण केलें आहे. एका बाजूला कठोर वास्तव सामाजिक परिस्थिति आणि दुसऱ्या बाजूला व्यक्तित्वविकासाची, स्वातंत्र्याची प्रेरणा या द्वंद्वाच्या संघर्षांत सांपडलेल्या लतेच्या व्यक्तित्वाला लेखिकेनें जी उन्नतिकारक कलाटणी दिली आहे, ती या कथेच्या भोंवतालच्या समाजांतोल उच्चतम सांस्कृतिक मूल्यांशीं सुसंगत व म्हणूनच आनंददायक वाटते. कादंबरीची भाषा सरळ व चुरचुरीत व संवाद अत्यंत स्वाभाविक असून, लेखिकेचें अवलोकन व मनुष्यस्वभावाचें ज्ञान सूक्ष्म दिसून येते.

"मी शाळेची कधीं पायरी चढलें नाहीं, अथवा उच्च शिक्षणहि घेतलें नाहीं, सध्या मी पन्नाशी उलटलेली व थोडाफार जगाचा व संसाराचा अनुभव घेतलेली अशी पोक्त स्त्री आहे" असें लेखिकेनें आरंभीं निवेदनांत म्हटलें असून तिचें हें प्रकटपणें वाङ्मयक्षेत्रांत पहिलेंच पाऊल आहे ही गोष्ट लक्षांत आणल्यास प्रस्तुत कादंबरीविषयींचें कौतुक द्विगुणित झाल्याशिवाय रहात नाहीं.

— वि. म. बेडेकर



